


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १७ वे ]     नोव्हेंबर १९६२     [ अंक २



वार्षिक वर्गणी ९ रु. ]     [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

## नवभारत मासिकाच्या

वाचकास,

सर्व ग्राहकास व हितचिंतकास

# ही दीपावली व नूतन वर्ष

सुखाचे व समृद्धीचे जावो !





अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

# नवभारत

वर्ष सतरावे — अंक दुसरा — नोव्हेंबर १९६३

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, 'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर, १८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २, फोन नं. २३५५४






प्रा. न. र. फाटक

# रामदासी वादाचा परिचय : २ :

## अभिनंदनातला चोमडेपणा

१९३० च्या जानेवारीत कै. काकासाहेब खाडिलकर साबरमतीच्या तुरुंगातून सुटून मुंबईस आल्यावर त्यांच्या भेटीकरिता पुष्कळजण येत असत. त्यात एक सोलापूरचे गृहस्थ होते. त्यांचा व खाडिलकरांचा पूर्वीचा परिचय नव्हता. पण तुरुंगातून घरी आलेल्या एका देशभक्ताचे अभिनंदनपुण्य सहज गाठीस मारता येत असेल तर अशी संधी का दवडा, अशा भावनेने ते खाडिलकरांच्या भेटीस आलेले होते. येता क्षणी खाडिलकरांना भुईपर्यंत वाकून त्यानी प्रणाम केला व आपण कोण कुठले वगैरे माहिती सांगून 'आपल्या गैरहजेरीत नवाकाळ पत्राने चांगली—अगदी आपण जागेवर असल्याप्रमाणे—कामगिरी बजावली, आपली उणीव मुळीच भासू दिली नाही' असे म्हटले. त्या भेटीच्या वेळी वादकर्ता तेथेच असल्यामुळे खाडिलकरांनी 'या कामगिरीचे श्रेय (नाव उच्चारून) यांचे आहे.' असे आपल्या उदार स्वभावास अनुसरून त्या गृहस्थाला सांगितले. त्या इसमाने झटकन् आपली दृष्टि खाडिलकरांनी निर्देशिलेल्या व्यक्तीकडे वळवून 'हे समर्थविषयक वादकर्ते का?' असे विचारले. (त्याने संपूर्ण नाव उच्चारले होते) 'होय' हे उत्तर ऐकून "राजकारणाचे काम स्तुत्य रीतीने काकासाहेब तुरुंगात असताना पार पडले तरी मधून मधून त्यात समर्थाविषयी जो मजकूर प्रसिद्ध केला जात होता, त्याने मात्र वाचकांचा विरस झाल्याशिवाय रहात नव्हता. तुमच्या संपादकीय कामगिरीला हे गालबोट नसते तर बरे झाले असते." रामदासीवाद खाडिलकर तुरुंगात जाण्यापूर्वी सुरू झाला होता व त्याना त्याची ऐकून माहिती होती. आपल्या गैरहजेरीत नवाकाळमध्ये हा वाद शिरला की काय, अशा संशयाने त्यानी आपली नजर वादकर्त्यावर रोखली. ज्याच्यावर मजकूर छापल्याचा आरोप त्याला आपली बाजू मांडणे आता अवश्य होऊन त्याने बोलायला सुरवात केली. "काकासाहेबांच्या गैरहजेरीत आपल्या कोणत्याही मताचा वासदेखील नवाकाळमध्ये नको, अशा कटाक्षाने वागलो. त्यात रामदासी वादाचे एक अक्षरसुद्धा सापडणार नाही. पाहिजे तर मी नवाकाळची फाइल आणतो. त्यात वादाचा मजकूर दाखवा," असे आव्हान दिल्यावर तो सोलापुरचा गृहस्थ गप्प बसला व खाडिलकरांनी आपली तीव्र दृष्टि त्याकडे वळविली. हे आव्हान स्वीकारण्याची तुमची तयारी नाही यावरून तुम्ही माझ्यामागे ज्याने नवाकाळ संभाळला, त्याच्याविषयी निष्कारण खोटा आरोप केला असे उघड आहे. तुम्ही भेटायला आला व हा अव्यापारेषु व्यापार केला असा या मौनाचा अर्थ होतो. मी सुटून घरी सुखरूप आलो म्हणून तुम्ही केलेले अभिनंदन मला पावले. मी त्याबद्दल आभारी आहे, पण आता तुम्ही येथून जावे हे बरे. इतके बोलून खाडिलकरांनी त्याला घालविले. खाडिलकरांना अन्यायाची विलक्षण चीड होती, हे निदर्शनास आणणे असा सोलापुरकरांची गोष्ट नमूद करण्याचा मुख्य हेतु नाही. समर्थभक्तीचे अनाठायी प्रदर्शन करणारी सामान्य माणसे महाराष्ट्रात आहेत याचा बोध होण्याकरिता ही गोष्ट सकृद्दर्शनी किरकोळ असूनही मुद्दाम सादर केलेली आहे. या संदर्भात आणखी एक मौजेचा मासला दाखल करण्याला हरकत वाटत नाही.








## ठाण्याची व्याख्याने व मौजा

वादाला तोंड लागल्यावर ठाण्यातील एका संस्थेने समर्थांविषयी मुख्य वादकर्त्याचे काय म्हणणे आहे, ते त्याच्याच तोंडून ऐकावे आणि त्याच्या वादाला समोरासमोर उत्तर देऊन त्याला फजीत करून सोडावे, अशा ईर्ष्येच्या कित्येकांनी वादकर्त्याला ठाण्यास बोलावले. वादाचे मुद्दे प्रतिदिवशी उलट बाजूच्या अभ्यासकांनी व्याख्यान होताच खोडावे असे ठरले होते. पहिल्या दिवशीच्या व्याख्यानात वादकर्त्यांच्या तोंडून दासबोधात 'महाराष्ट्रधर्म' हा शब्द नाही', असे विधान बाहेर पडताच श्रोत्यांपैकी एकजण व्याख्यान चालू असता मध्येच उठला व त्याने "म्हटलं, मी रोज दासबोधाचे पारायण करणारा आहे; म्हटलं, दासबोधात महाराष्ट्रधर्म हा शब्द पुष्कळदा वाचला आहे. तुम्ही नाही म्हणता ते, म्हटलं चुकीचं आहे बरे कां, ते विधान मागे घ्या." असे रागाच्या आविर्भावात बोलून टाकले. त्याला बोलताना वाक्यावाक्यात 'म्हटलं', हा शब्द वापरण्याची सवय होती. व्याख्यात्याला असा छातीठोक अडथळा करणारा इसम साहजीकच सर्वांना कौतुकास्पद वाटला. 'आपण पारायण म्हणजे नजरेपुढून ग्रंथाच्या पानातील मजकूर दौडवीत असाल. पण ग्रंथांत कोणते विषय आहेत, कोणते महत्त्वाचे शब्द आहेत, याचे ज्ञान पारायणाने होत नाही. मी पुन: सांगतो की महाराष्ट्रधर्म हा शब्द दासबोधात नाही. आपण उद्या आपल्या दासबोधात तो शब्द कोणत्या ठिकाणी आलेला आहे, ते दाखविण्याकरिता ग्रंथासह या' अशी जबाबदारी त्यावर टाकून व्याख्यान पुढे चालू झाले. व्याख्यान आटपताच मसूर येथे नव्याने प्रसिद्धीस आलेल्या रामदासीबुवांच्या शिष्यगणात काही काळ वावरलेला एक इसम खंडनार्थ उभा राहून उत्तर देऊ लागला. 'तुम्ही आता व्याख्यान ऐकले. ते किती पोकळ होते याचा तुम्हाला अनुभव आला हे चांगले झाले.' त्याच्या वक्तृत्वाचा प्रारंभ याप्रमाणे घडला. सदर इसमाबद्दल तो इतिहासाचा संशोधक, अभ्यासी यासारखे स्तोम होते. याच्या लेखनाचा विशेष 'खाणे थोडे, मचमच फार' किंवा 'मंत्र थोडा, थुंका फार' या म्हणीने स्पष्ट होईल. व्याख्यानाचीसुद्धा तऱ्हा अशाच स्वरूपाची होती. मुख्य व्याख्यात्याचे भाषण पोकळ असल्याचा दावा मांडून पुढे त्याने स्वतःबद्दल जो खुलासा केला तो कानावर पडताच श्रोत्यांतले जे कोणी वादीच्या पक्षाचे होते त्यांनी 'खाली बसा, बोलू नका' वगैरे आरोळ्यांचा गोंगाट चालविला. त्याच्या खुलाशाचा इत्यर्थ असा की, 'मी समर्थांचे व समर्थासंबंधाचे सारे वाङ्मय वाचलेले नाही. यापुढे वाचणार आहे, पण वक्त्याच्या खंडनाला साऱ्या समर्थवाङ्मयाच्या अभ्यासाची गरज नाही.' पुढे त्याने वादी कुठे काम करतो; 'नवाकाळ'कडे असूनही विविधवृत्तात लिहितो, असे चऱ्हाट वळायला जेव्हा प्रारंभ केला तेव्हा गोंगाट माजला. गोंगाटाला न जुमानण्याचे धैर्य थोड्याच वेळात गळून त्याने बैठक धरली.

दुसऱ्या दिवशी ठाण्याचे जुने रहिवासी आणि खऱ्या अर्थाने विद्वान म्हणून नावाजली जाणारी एक व्यक्ती वक्त्याने आपल्या एका समर्थविषयक लेखात समर्थांच्या शिष्यिणींचे प्रकरण देऊन त्यांची (समर्थांची) भयंकर नालस्ती केल्याचे आपण दाखविणार आहो, अशा डौलाने व्याख्यानानंतर उभी राहिली. विज्ञाविस्तारातील एका लेखात समर्थांच्या शिष्यिणीविषयी निरनिराळ्या इतिहासकालीन समर्थचरित्रातून समर्थशिष्यप्रशिष्यांनी जे काही लिहून ठेवले आहे, त्याचा एकत्र संग्रह करून ते लेखन आज समर्थनिंदेला कसे कारणीभूत होऊ शकेल याचे विवेचन आहे. त्या विवेचनाविषयी धुळ्याच्या रामदास-रामदासी मासिकात श्री. देवांनी खंतीच्या भाषेत लिहिले की, आता समर्थांची निंदा करण्यापर्यंत वादकर्त्याची मजल गेली आहे. मासिकाचा संपादक या








नात्याने मला अनेक नियतकालिके चाळावी लागतात. त्यांतील विज्ञाविस्ताराच्या त्या अंकातील ते शिष्यिणी-प्रकरण शिव शिव म्हणत वाचले. महाराष्ट्राने ते वाचू नये. ती पाने दुमडून टाचून दृष्टी-आड करावी, फाडून जाळून टाकण्याचा उपदेश नाही. जे झाकावे तेच नेमके पाहण्याचा मोह आजूबाजूच्या लोकांना हटकून होतो, हा मनुष्य-स्वभाव आहे याचे भान देवांना राहिले नाही. देवांच्या वरील अभिप्रायाचा परिणाम बहुधा ठाण्याच्या विद्वानावर झालेला असावा. जुन्या समर्थ-भक्तांनी समर्थशिष्यिणींच्या ज्या कथा आपापल्या लिखाणात भरल्या आहेत त्या पूर्ण विश्वासार्ह अशा भावनेने विज्ञाविस्तारातील लेख लिहिलेला नाही. असा खुलासा व्याख्यात्याने केला तेव्हा ठाण्याच्या सदर टीकाकाराने मूळ लेखकाचा त्या कथांवर विश्वास असल्याची वाक्ये वाचून दाखवितो. असे श्रोत्यांना सांगून विज्ञाविस्तार मासिकाची पाने उलट सुलट हालविण्यात काही मिनिटे दवडली व 'ती वाक्ये उद्या दाखवीन' असे श्रोत्यांना आश्वासून त्या प्रतिवक्त्याने माघार घेतली. हा विद्वान् व्याख्यानापूर्वी तासभर विज्ञाविस्ताराचे अंक जमवून व्याख्यानाच्या दिवाणखान्यामागील एका खोलीमध्ये ते वाचीत बसला होता. आयत्यावेळी घाईने लेख वाचून त्याने खंडन करण्याइतके ते लेख साधे नाहीत. ह्यामुळे हा विद्वान मागसला व जो मागसला तो कायमचाच. तिसऱ्या दिवसाचे आश्वासन त्याने मोडले. तो फिरून सभास्थानी दिसला नाही.

दासबोधपारायणकाराच्या आव्हानाचा शेवट असाच सर्वांच्या अनुभवास आला. तो ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सभेस येऊन त्याने व्याख्यान ऐकले. ठाण्याचा विद्वान मागे हटल्यावर त्या पारायण-काराला जवळ बोलावले आणि दासबोधातील महा-राष्ट्रधर्म शब्दाबद्दल पृच्छा केली. दासबोधात जर तो शब्द नाहीच तर तो आहे असे पारायणकार सांगणार कोणत्या तोंडाने ? तो लाजेने खाली मान करून उभा राहिला व बोलला, 'आज रजा घेऊन सारा दिवस दासबोध चाळीत होतो, पण तो शब्द साप-डला नाही. त्यात नाही अशी खात्री झाली. मी सभेत उभा राहून तुम्हाला अडथळा करायला नको होता.' त्याचे याखेरीज दुसरे उत्तर मिळणे शक्यच नव्हते व त्याबद्दल अधिक चर्चा करण्यात लाभ नव्हता, हे जाणून केवळ जिज्ञासेने 'तुम्ही वर्षानु-वर्ष पारायण कशासाठी करता' असा प्रश्न त्याला केला व खरी मौज त्याने दिलेल्या उत्तरात आहे, केवळ विनोदच नव्हे तर समर्थभक्तीचा एक विचित्र प्रकार त्यात दिसून येतो. आपल्याला लग्नानंतर बरीच वर्षे मूल झाले नाही. मूल पाहिजे ही चिंता दासबोधाच्या पारायणाने निकालात निघाली. दास-बोधपारायणाने मुले होऊ लागतात, हा सल्ला एका मित्राने दिला, कारण त्याचा तसा अनुभव होता. आपण दरदिवशी फुरसतीप्रमाणे कधी जास्त कधी कमी असा न चुकता मी दासबोध वाचीत असतो. सध्या घर मुलाबाळांनी भरलेले आहे. हा दासबोध पारा-यणाचा खुलासा ऐकून बऱ्याच जणांना हसू आले. समर्थांनी आमरण आचरलेल्या कडकडीत ब्रह्मचर्य-व्रताची पुण्याई दासबोधपारायणाच्या संततिदानाने अनुभवास यावी हा चमत्कारच म्हटला पाहिजे, असा विनोद रामदासीवादाच्या मुख्य वक्त्याने केला, परंतु असे पारायणही समर्थांच्या व्रताची कुचेष्टा आहे, असेही त्यास वाटले. प्रांजळपणे आपल्या दासबोधपारायणाचा खुलासा केल्याबद्दल तो करणा-राचे आभार मानणे अवश्य होते. ते काम उरकून व्याख्यात्याने असले वाचन वादाच्या खंडनमंडणाला उपयोगी नाही, हे पारायणकाराला सांगून हा प्रसंग संपविला.

तिसऱ्या दिवशी वादाकरिता कोणी उपवक्ता-पुढे आला नाही. अध्यक्ष होते ठाण्यास रहाणारे पण मुंबईच्या एका मिशनरी कॉलेजात केवळ जन्मभाषा

म्हणून– पदवीपरोक्षेचा विषय म्हणून नव्हे– मराठी वाङ्मय शिकविणारे प्राध्यापक. त्यांनी राजकारण म्हणजे 'कारणानां राजा' याप्रमाणे त्या शब्दाचा अर्थ लावला. हे प्राध्यापक विद्वत्तेपेक्षा सार्वजनिक जीवनातील मानाच्या जागा मिळविण्याच्या खटपटी-लटपटी साठी जास्त प्रसिद्ध होते. ठाणे जिल्हा स्कूल-बोर्डाच्या अध्यक्षस्थानी असता त्यांच्या कारभाराने वैतागलेले जे बोर्डाचे सदस्य किंवा शिक्षक तेथे हजर होते, त्यांनी प्राध्यापकमजकुराच्या वक्तव्या-मध्ये वाक्यावाक्यात दोष काढून त्यास हिणविण्याचा उपक्रम चालविला होता. यामुळे समर्थांचा विषय बाजूस पडून हिणविणारे सभासद व अध्यक्ष यांच्यात मधून मधून बाचाबाची चाले. वादाचा विषय केवळ दासबोध, मनाचे श्लोक, करुणाष्टके या वाङ्मयावर अवलंबून नव्हता. समर्थचरित्र सांगणारी जुनी ओवीबद्ध चरित्रे, बखरी, आणि ऐतिहासिक कागद-पत्रे अशा विविध साहित्याचा त्या वादाशी संबंध होता. हे सारे साहित्य नजरेखाली घातलेला श्रोता एकही नसावा, यात आश्चर्य नाही. तथापि ज्ञानाच्या अभावी गतानुगतिकत्वाने– अर्थात् धुळ्याचे देव काय म्हणतात, पुण्याचे करंदीकर काय लिहितात किंवा बोलतात, याची मुळाबरहुकूम नव्हे तर चुकीची वाच्यता करून प्रसंग धकवून नेण्याच्या प्रवृत्तीचे लोक जास्त, हे निराळे सांगायला नको. व्याख्याने संपल्यावर ज्यांना वादविषय समजावून घेण्याची प्रामाणिक इच्छा होती, त्यांच्याशी संवाद करताना त्यांच्या समर्थविषयक ज्ञानाची खोली सहज ध्यानात येत होती. एकजण दासबोध किंचित् बारकाईने वाचलेला आढळला. त्याने थोडा वाद घातला, पण त्यानेच तो आवरला. ठाण्यास नंतर आणखी एक दोन संस्थांनी वादाचे प्रसंग निर्माण केले. त्यांच्या शेवटी श्रद्धेच्या आग्रहाचे प्रदर्शन, असाच अनुभव आला. देव–करंदीकरांचे आधारादाखल नाव उच्चारणारांनी त्यांचे लेखन मुळीच किंवा धड वाचलेले नसावे, हे विस्मयाचे नसले तरी खेदकारक होते. समर्थांचा अभिमान बाळगणारे त्यांच्या वाङ्मयाचे वादाची ईर्ष्या धरून-सुद्धा अभ्यासक नसावे, हा अनुभव निःसंशय खेद-जनक वाटतो. प्रस्तुत अनुभव ज्ञानाच्या इतर अनेक क्षेत्रातही पुष्कळदा जाणवतो.

## कै. ज. स. करंदीकरांचे समर्थज्ञान

१९३०–३१ ही वर्षे वादाची होती. पुण्यास कै. ज. स. करंदीकरांनी समर्थचरित्राची एक व्याख्यानमाला गुंफली. त्यांच्या एका चहात्याने छाप-लेल्या लेखसंग्रहात ती जिज्ञासूंना पहायला सापडेल. करंदीकरांनी आपल्या व्याख्यानात शिवाजीमहा-राज हे समर्थांच्या हातातले एक बाहुले होते, महा-राजांनी आग्र्यास अटकेत पडावे आणि स्वामींनी ते अटकेतून पळाल्यावर मार्गात ठिकठिकाणी साह्य व संरक्षण पुरवावे; मथुरेस ज्या महाराष्ट्रीय ब्राह्म-णाने संभाजीस आपल्याजवळ ठेवून घेतले, त्याची योजना रामदासांनी आधीच केलेली होती; सम-र्थांच्या एका शिष्याला अकस्मात् एके दिवशी आकाशवाणी ऐकू आली व तो उत्तर दिशेस जाण्याला निघाला अशा अर्थाची एक ओवी 'समर्थप्रताप' नावाच्या समर्थचरित्रात आहे. ओवीतील आकाश-वाणी ( मूळात अकस्मातवाणी आहे ) म्हणजे समर्थांचा गुप्त सीलबंद लखोटा, असा करंदीकरांनी अर्थ लावून तो उत्तर दिशेस जाण्याचे कारण शिव-छत्रपतीची आग्र्याहून सुटका व पळापळ या संबं-धात समर्थ करीत असलेली तजवीज असे दाख-विले आहे. त्या तजविजीचा सदर शिष्य एक घटक होता. तो मथुरेस गेला व त्याने संभाजीला संभाळले आणि महाराष्ट्रात आणून पोचविले, म्हणून छत्र-पतींनी त्यालाच 'विश्वासराव' हा किताब दिला, असे करंदीकरांचे म्हणणे आहे. आकाशवाणी=गुप्त आज्ञेचा मोहोरबंद लखोटा. उत्तरदिशा = एक मथु-राच दुसरे ठिकाण नाही;; अशी समर्थचरित्र रंग-








विण्याची किंबहुना बनविण्याची करंदीकरांची तऱ्हा आहे. मुळात स्थळकाळाचा निर्देश नसला तरी करंदीकरांच्या तर्कचापल्याला त्याची अडचण कधीच वाटत नव्हती. एकदा पारगावला रामजन्मोत्सव झाल्याचे वृत्त जुन्या समर्थचरित्रात करंदीकरांना दिसले. तत्काळ त्यांचा तर्क पन्हाळगड छत्रपतींनी जिंकल्याच्या प्रसंगाकडे धावला व हा उत्सव पन्हाळगड जिंकण्याच्या पूर्वतयारीसाठी होता, हे तात्पर्य त्यांच्या तर्कतट्टाने गाठले. वाकेनिशी टिपण या नावाचा एक कागद वि. का. राजवाड्यांनी छापला आहे. त्यात शके १५५४ मध्ये शिवनामा जन्मास आला अशी एक नोंद आहे. इ. स. १६३२ मध्ये (शके १५५४) पुरश्चरण आटपून समर्थ तीर्थाटनास निघाले. २४ वर्षे वयाच्या समर्थांनी शिवजन्मार्थ जिजामातेच्या बाळंतपणाला एखादी शिष्या पाठविली होती, असा तर्क करंदीकरांनी लढविला नाही (त्याला शिवनामा जन्मास आला या नोंदीचा आधार आहे) व शिवरायाची अवतारसमाप्ति पाहून समर्थांनी इहलोक सोडला, असे करंदीकरांनी म्हटले नाही, याचे त्यांच्या इतर तर्काद्भुताकडे पाहून आश्चर्य वाटते. त्यानी तसे प्रतिपादन केले असते तर मग जन्मापासून निधनापर्यंत शिवछत्रपतींचे चरित्र समर्थांनी घडविले या कल्पनेत कसलेच न्यून राहिले नसते.

याच वेळी मुंबईतील दक्षिणी ब्राह्मणसभेच्या गणेशोत्सवात वादाच्या विषयावर करंदीकरांचे व्याख्यान झाले. त्याला मुख्य वादकर्त्याने उपस्थित रहावे, असे सभेच्या एक दोघा कार्यवाहांनी सुचविले. करंदीकरांना उत्तर देण्याची संधी मिळत असेल तर उपस्थित राहण्याला हरकत नव्हती, पण तशा संधीच्या पृच्छेला नकार मिळाल्याने उपस्थित राहिल्यास करंदीकर जी सभ्यासभ्य टीका करतील ती बाकीच्या उपस्थितांदेखत निमुटपणे वादकर्त्याला ऐकायला लावण्याचा हा डाव होता अर्थातच तो वादकर्त्याच्या अनुपस्थितीने हुकला. त्या दिवशीच्या व्याख्यानात करंदीकरांनी पांगारकरांच्या 'समर्थसंजीवनी' नामक पुस्तकातून एक श्लोक काढून त्याच्या आधारे सध्याच्या वादकर्त्यासारखी माणसे पुढे निघणार असे समर्थांचे भविष्य असल्याचा अगदी पोरकट कोटीक्रम खेळविला. 'नरे पामरे मत्सरे पापरूपे' असा त्या कवितेचा प्रारंभ आहे. सुरवातीच्या नरे या दोन अक्षरात टिंबे नाहीत पण न रे कोण हे स्पष्ट कळणारे आहे. न. र. ही नावाची आद्याक्षरे मानावी. नरे हे त्यांचे तृतीयेचे रूप. श्रोत्यांना कदाचित् या कोटीने गुदगुल्या झाल्या असतील पण त्या श्रोत्यांमध्ये श्री. म. वर्दे वकील होते. त्यानी ते पुस्तक व्याख्यान संपल्यावर मागून घेतले आणि श्लोक वाचले. त्यात एका श्लोकाच्या शेवटी 'श्वान जसे' हे शब्द त्याना दिसले आणि विविधवृत्तात समर्थांना ज्याप्रमाणे 'नरे'चे भविष्य कळले होते त्याचप्रमाणे 'जसे' चेही भविष्य माहीत होते. 'ज से' ही अक्षरे मध्ये टिंब ठेवून तोडलेली नाहीत, तरी समर्थांच्या भविष्याला बाध येत नाही, वगैरे आशय व्यक्त करून वर्दे यानी 'नरे' ला माणसांच्या वर्गात जागा दिलेली आहे, पण 'श्वान जसे' यांतील श्वान शब्दाने 'जसे' ना पशु व तोही श्वानासारखा हलका पशु समर्थांनी गणले आहे, वगैरे युक्तिवादाने करंदीकरांचा कोटीक्रम त्यांच्यावर उलटविला होता. वाद जिंकण्यासाठी एखादा गृहस्थ कसा घसरतो हे समजण्याकरिता करंदीकरांचा कोटीक्रम येथे दाखल केलेला आहे. वादाच्या वादळात 'नरे'च्या बाजूने जे दोघे भाग होते, त्यापैकी वर्दे आणि रामभाऊ नाडकर्णी या दोघांचे कृतज्ञतापूर्वक स्मरण करणे अवश्य आहे. त्या स्मरणाला सवड पाहिजे, हा करंदीकरांच्या व्याख्यानाचा निर्देश करण्यामध्ये एक हेतु आहे. करंदीकर हे समर्थवाङ्मयाचे अभ्यासी होते, यात संशय नाही. पण श्रद्धातिरेकाने जन्मास आलेले त्यांचे पूर्वग्रह विचित्र असल्यामुळे ते देवांनी स्वीकारलेले नाहीत.

करंदीकरांना कधीमधी एका व्यासपीठावरून उभयपक्षाचा वाद व्हावा, असे वाटत असावे. एकदा त्यानी तशा कल्पनेचे मुंबईतील तत्त्वज्ञानमंडळाकडे पत्र पाठविले. त्याच्या आव्हानाला स्वीकाराचे उत्तर जाताच त्यानी पवित्रा बदलून मुंबईच्या न्यायमूर्तीपैकी एक आणि भारतरत्न म. म. पां. वा. काण्यांसारखा एक स्वतंत्र विद्वान् याप्रमाणे दोघांना पंच नेमून त्यांच्यापुढे दोन्ही पक्षांनी आपले म्हणणे मांडावे. त्यावर पंच जो निकाल देतील तो दोन्ही बाजूंनी मान्य करावा, असा पहिल्या पत्रात नसलेला नवा बेत कळविला. समर्थांचे, समर्थशिष्यांचे वादोपयोगी वाङ्मय आणि ऐतिहासिक कागदपत्रे, हे पंच, त्याच्याद्वारे जे उभयमान्य निष्पन्न होईल तो निर्णय; अशी उलट सूचना मुंबईहून गेल्यावर एका व्यासपीठावरून वाद करण्याची लहर करंदीकरानी कायमची दाबून टाकली. साधारणपणे १९३५ मध्ये धुळयास श्रीसमर्थवाग्देवतामंदिराची स्थापना झाल्यावर बरेच जण या वादातून बाहेर पडले होते. एकटे करंदीकर मात्र निमित्त सापडले की कडाडून बोलत किंवा लिहीत असत. १९५१ मध्ये चित्रशाळेने श्रीसमर्थचरित्र छापल्यावर करंदीकरांनी ' सह्याद्रि ' मासिकाची बरीच पाने आपल्या अनधिकृत टीकेने काळी केली. १९५२ च्या फेब्रुवारीत पुण्याच्या एका संस्थेत दासनवमी साजरी करताना स्वामींचे एक नवे रंगीत समर्थचित्र तेथे लावण्यात आले. करंदीकर हे प्रवक्ते होते. १९५१ तील चित्रशाळेच्या समर्थचरित्राची स्वतःच्या ठाम समजुतींना धरून चावाचाव करूनदेखील करंदीकरांची खवखव शिल्लक होती. ती शमविण्याचा करंदीकरानी १९५२ च्या दासनवमीच्या संधीस यत्न केला. नवमी समर्थांची व पुण्यतिथी त्यांना रामदासांच्या एका श्लोकात सापडलेल्या ' नरे'ची, असा त्यांच्या व्याख्यानाचा थाट होता. बाहेरगावी जाणाऱ्या केसरीच्या आवृत्तीत त्याचा विस्तृत सारांश छापून आला. परंतु स्थानिक आवृत्तीत गळला, हे लक्षात ठेवून केसरीची फाइल चाळावी; त्या व्याख्यानात करंदीकरांनी दासबोधातील राजकारणाच्या समासांची १९५१ मधील संख्या चाळीसावरून पंचवीसावर आणली, हे मुद्दाम सांगणे अवश्य आहे. सह्याद्रीतील टीकला अनधिकृत असे वर म्हटले याचे कारण समर्थचरित्र अभिप्रायाकरिता पाठविले नव्हते व करंदीकर संपादक नव्हते. अशी स्थिति असून केसरी–मराठा संस्थेचे विश्वस्त या नात्याने त्यांचा टीकालेख छापणे सह्याद्रीच्या संपादकाला भाग पडले. याच नात्याने त्यांनी प्रतिटीकेचा लेख सह्याद्रीत छापण्याला मनाई केली. तो लेख चित्रमयजगत् मध्ये नंतर प्रसिद्ध झाला. करंदीकरांच्या मतासंबंधी पुष्कळ विचार ' श्रीसमर्थचरित्र ', ' श्रीसमर्थवाङ्मय आणि कार्य ' या पुस्तकातून आणि वेळोवेळी कारणपरत्वे लिहिलेल्या लेखातून केलेला आहे.

### अनंतदास व पांगारकर

करंदीकरांचा यांच्या मतांशी स्पर्धेने ज्यांच्या मताचे सादृश्य सुरू होते असे एक रामदासी नुकतेच दिवंगत झालेले श्री. अनंतदास हे होते. त्यांनी ' श्री समर्थ गाथा ' नावाचे पुस्तक प्रसिद्ध करून त्याला करंदीकरांची प्रस्तावना जोडली आहे व त्यांचे स्वतःचेही लेखन त्यात आहे. अनंतदास हे समर्थनिष्ठ व समर्थवाङ्मयाचे अभ्यासी होते. काही वर्षांपूर्वी त्यांनी ' दासायन'नामक स्वलिखित समर्थचरित्र प्रकाशात आणल्याचे कदाचित् कित्येकांना ऐकून ठाऊक असेल. ते कधी दंड थोपटून प्रतिपक्षाबद्दल गालिप्रधान आव्हानाच्या आरोळ्यामारीत वादाच्या धुमाळीत शिरले नसले तरी प्रतिपक्षाविषयी त्यांची दृष्टि सदैव गढुळलेलीच राहिली; याची प्रत्यंतरे त्यांच्या लिखाणात दिसतात.

समर्थांना इतर वारकरी संतांहून श्रेष्ठ मानण्याचा प्रकार पांगारकरांना रुचत नव्हता म्हणून त्यांनी वादकाळात बहुतांशी तटस्थपणा स्वीकारल्याचा-










उल्लेख पूर्वी केलेला आहे. पण त्यांनासुद्धा रामदासांच्या राजकारणाचा मोह झुगारून त्यापासून अगदी अलिप्त राहाता आले नाही. दासबोधातला अमका समास शिवाजी–चंद्रराव मोरे यांची झुंज सुरू झाल्यावेळी लिहिला असावा, अमका अफझुलखानाच्या भेटीचा प्रसंग उभा राहिला तेव्हा रचला असावा, वगैरे अनुमाने त्यांनी लोकापुढे ठेवलेली आहेत. तसे करताना नेमके ज्या कारणासाठी समर्थांना इतर संतांहून वेगळे श्रेष्ठत्व देण्याचा प्रघात पडला आहे, त्याच कारणाला आपल्याकडून सदर अनुमानांच्या द्वारे दुजोरा मिळतो, याचे भान त्यास राहिले नाही.

अगदी अलीकडे सुमारे तीन वर्षामागे मुंबईस सज्जनगडावरील समर्थपादुकांचे चालक, भगवान् या उपाधीने समर्थसांप्रदायिकात ओळखले जाणारे बुवा आले होते. त्याच्या व्याख्यानमालेच्या एका पुष्पाचा समारोप करायला जन्मभर लोकांचा आर्थिक व्यवहार तपासण्याचा धंदा चालवून वृद्धपणी शिखासूत्राच्या त्यागाने कुठल्याशा स्थानी शंकराचार्य बनलेली एक व्यक्ति आयत्या वेळी आली. तिला व्याख्यानाचा विषय किंवा त्यातील युक्तिवाद माहीत नसूनही त्यांना रामदासांचे राजकारण नाकारणारावर दोन चार फटकारे लगावण्याची हुक्की येऊन ते काम त्यांनी पार पाडले. राजकारणाचे सांगोपांग स्वरूप ‘ काय जाणती गव्हारे ’ असे एक समर्थांचे वचन आहे. “ यातला गव्हार हा शब्द माझा नाही बरें. समर्थांनी राजकारणाबद्दल शंका घेणारांना अनुलक्षून त्याचा वापर केला आहे. शंकेखोराची संभावना समर्थांनी केलेली आहे. अशा गव्हाराविषयी सावध राहिले पाहिजे ” वगैरे आशयाचे लहानसे चऱ्हाट वळले.

## व्यवहारचातुर्य व राजकारण

महाराष्ट्रात समर्थांच्या पद्धतीची भाषा वापरून विषय काही नसला तरी किंवा विषयान्तराने तासन् तास श्रोत्यांना बसल्या जागी खिळून ठेवणाऱ्या एका प्रसिद्ध वक्त्याची गाठ पडली तेव्हा त्याने Politics म्हणजे नऊ दशांश व्यवहारज्ञान (common sense) ही इंग्रजी म्हण पुढे दामटून या म्हणीच्या तात्पर्याने रामदासांच्या राजकारणाचा अर्थ लावला पाहिजे. पोलिटिकल आत्याबाई असा लेख केसरीने आपल्या सुरवातीच्या काळात वापरला आहे. हा इसम मोठा पोलिटिकल आहे असे आपण एखाद्याबद्दल म्हणतो ना. अशा प्रयोगाकडे लक्ष देऊन समर्थांचा राजकारण शब्द पारखला पाहिजे. सदर पुरुषाला गैरलागू विधाने करून लोकांना भ्रमात टाकण्याची व त्यायोगाने रमविण्याची हातोटी अंगवळणी पडलेली आहे. पॉलिटिक्सविषयी त्याची वरील व्याख्या ऐकून पोलिटिकल शब्दाचे दोन्ही प्रयोग धूर्ततावाचक आहेत, अत एव ते व्यवहारकुशलतेत पडतील. नऊदशांश कॉमन सेन्स ज्या एकदशांशाच्या भरतीने राजकारण ठरते, त्या एक दशांशाचे स्वरूप विशद करून समर्थांच्या राजकारणात तो अंश कोठे कसा आला आहे, हे समजावून द्या, असा समर्थांच्या राजकारणाला व्यवहारचातुर्य ठरविणाराने म्हटल्यावर त्या व्यक्तीने आपल्या खड्या आवाजाला तार सप्तकात चढवून “ व्यवहारचातुर्य हा शब्द समर्थांना ठाऊक नव्हता की काय? त्यांनी राजकारण हा शब्द का योजावा हे काहीच कसे विचारात घेत नाही ” अशा प्रश्नांची गर्जना केली. ओक्साबोक्षी ओरडल्याने फार तर तसे करणाराचे नरडे बळकट असल्याची खात्री पटेल पण वादातल्या मुद्याचे समाधान नव्हे. “ आवाजाच्या अक्राळविक्राळ उंचीबद्दल आपणास अजिंक्यपत्र देण्याची तयारी आहे. पहाडी आवाज कुणाचा हा प्रश्न नाही. ” अशी त्या आवाजाची प्रशंसेने वासलात लावून पुनः कंठाचा खणखणाट ऐकवायला ते तयार होणार नाहीत, अशी त्यांची अवस्था पाहून “ समर्थांनी एकाच निश्चित अर्थाने आपले शब्द सर्वत्र वापरलेले नाहीत. एकाच अर्थाचे

करंदीकरांना कधीमधी एका व्यासपीठावरून उभयपक्षाचा वाद व्हावा, असे वाटत असावे. एकदा त्यानी तशा कल्पनेचे मुंबईतील तत्त्वज्ञानमंडळाकडे पत्र पाठविले. त्याच्या आव्हानाला स्वीकाराचे उत्तर जाताच त्यानी पवित्रा बदलून मुंबईच्या न्यायमूर्तीपैकी एक आणि भारतरत्न म. म. पां. वा. काण्यांसारखा एक स्वतंत्र विद्वान् याप्रमाणे दोघांना पंच नेमून त्यांच्यापुढे दोन्ही पक्षांनी आपले म्हणणे मांडावे. त्यावर पंच जो निकाल देतील तो दोन्ही बाजूंनी मान्य करावा, असा पहिल्या पत्रात नसलेला नवा बेत कळविला. समर्थांचे, समर्थशिष्यांचे वादोपयोगी वाङ्मय आणि ऐतिहासिक कागदपत्रे, हे पंच, त्याच्याद्वारे जे उभयमान्य निष्पन्न होईल तो निर्णय; अशी उलट सूचना मुंबईहून गेल्यावर एका व्यासपीठावरून वाद करण्याची लहर करंदीकरानी कायमची दाबून टाकली. साधारणपणे १९३५ मध्ये धुळयास श्रीसमर्थवाग्देवतामंदिराची स्थापना झाल्यावर बरेच जण या वादातून बाहेर पडले होते. एकटे करंदीकर मात्र निमित्त सापडले की कडाडून बोलत किंवा लिहीत असत. १९५१ मध्ये चित्रशाळेने श्रीसमर्थचरित्र छापल्यावर करंदीकरांनी 'सह्याद्रि' मासिकाची बरीच पाने आपल्या अनधिकृत टीकेने काळी केली. १९५२ च्या फेब्रुवारीत पुण्याच्या एका संस्थेत दासनवमी साजरी करताना स्वामींचे एक नवे रंगीत समर्थचित्र तेथे लावण्यात आले. करंदीकर हे प्रवक्ते होते. १९५१ तील चित्रशाळेच्या समर्थचरित्राची स्वतःच्या ठाम समजुतींना धरून चावाचाव करूनदेखील करंदीकरांची खवखव शिल्लक होती. ती शमविण्याचा करंदीकरानी १९५२ च्या दासनवमीच्या संधीस यत्न केला. नवमी समर्थांची व पुण्यतिथी त्यांना रामदासांच्या एका श्लोकात सापडलेल्या 'नरे'ची, असा त्यांच्या व्याख्यानाचा थाट होता. बाहेरगावी जाणाऱ्या केसरीच्या आवृत्तीत त्याचा विस्तृत सारांश छापून आला, परंतु स्थानिक आवृत्तीत गळला, हे लक्षात ठेवून केसरीची फाइल चाळावी; त्या व्याख्यानात करंदीकरांनी दासबोधातील राजकारणाच्या समासांची १९५१ मधील संख्या चाळीसावरून पंचवीसावर आणली, हे मुद्दाम सांगणे अवश्य आहे. सह्याद्रीतील टीकला अनधिकृत असे वर म्हटले याचे कारण समर्थचरित्र अभिप्रायाकरिता पाठविले नव्हते व करंदीकर संपादक नव्हते. अशी स्थिति असून केसरी–मराठा संस्थेचे विश्वस्त या नात्याने त्यांचा टीकालेख छापणे सह्याद्रीच्या संपादकाला भाग पडले. याच नात्याने त्यांनी प्रतिटीकेचा लेख सह्याद्रीत छापण्याला मनाई केली. तो लेख चित्रमयजगत् मध्ये नंतर प्रसिद्ध झाला. करंदीकरांच्या मतासंबंधी पुष्कळ विचार 'श्रीसमर्थचरित्र', 'श्रीसमर्थवाङ्मय आणि कार्य' या पुस्तकातून आणि वेळोवेळी कारणपरत्वे लिहिलेल्या लेखातून केलेला आहे.

## अनंतदास व पांगारकर

करंदीकरांचा यांच्या मतांशी स्पर्धेने ज्यांच्या मताचे साहश्य सुरू होते असे एक रामदासी नुकतेच दिवंगत झालेले श्री. अनंतदास हे होते. त्यांनी 'श्री समर्थ गाथा' नावाचे पुस्तक प्रसिद्ध करून त्याला करंदीकरांची प्रस्तावना जोडली आहे व त्यांचे स्वतःचेही लेखन त्यात आहे. अनंतदास हे समर्थनिष्ठ व समर्थवाङ्मयाचे अभ्यासी होते. काही वर्षापूर्वी त्यांनी 'दासायन'नामक स्वलिखित समर्थचरित्र प्रकाशात आणल्याचे कदाचित् कित्येकांना ऐकून ठाऊक असेल. ते कधी दंड थोपटून प्रतिपक्षाबद्दल गालिप्रधान आव्हानाच्या आरोळयामारीत वादाच्या धुमाळीत शिरले नसले तरी प्रतिपक्षाविषयी त्यांची दृष्टि सदैव गढुळलेलीच राहिली; याची प्रत्यंतरे त्यांच्या लिखाणात दिसतात.

समर्थांना इतर वारकरी संतांहून श्रेष्ठ मानण्याचा प्रकार पांगारकरांना रुचत नव्हता म्हणून त्यांनी वादकाळात बहुतांशी तटस्थपणा स्वीकारल्याचा








उल्लेख पूर्वी केलेला आहे. पण त्यांनासुद्धा रामदासांच्या राजकारणाचा मोह झुगारून त्यापासून अगदी अलिप्त राहाता आले नाही. दासबोधातला अमका समास शिवाजी–चंद्रराव मोरे यांची झुंज सुरू झाल्यावेळी लिहिला असावा, अमका अफझुलखानाच्या भेटीचा प्रसंग उभा राहिला तेव्हा रचला असावा, वगैरे अनुमाने त्यांनी लोकापुढे ठेवलेली आहेत. तसे करताना नेमके ज्या कारणासाठी समर्थांना इतर संतांहून वेगळे श्रेष्ठत्व देण्याचा प्रघात पडला आहे, त्याच कारणाला आपल्याकडून सदर अनुमानांच्या द्वारे दुजोरा मिळतो, याचे भान त्यास राहिले नाही.

अगदी अलीकडे सुमारे तीन वर्षामागे मुंबईस सज्जनगडावरील समर्थपादुकांचे चालक, भगवान् या उपाधीने समर्थसांप्रदायिकात ओळखले जाणारे बुवा आले होते. त्याच्या व्याख्यानमालेच्या एका पुष्पाचा समारोप करायला जन्मभर लोकांचा आर्थिक व्यवहार तपासण्याचा धंदा चालवून वृद्धपणी शिखासूत्राच्या त्यागाने कुठल्याशा स्थानी शंकराचार्य बनलेली एक व्यक्ति आयत्या वेळी आली. तिला व्याख्यानाचा विषय किंवा त्यातील युक्तिवाद माहीत नसूनही त्यांना रामदासांचे राजकारण नाकारणारावर दोन चार फटकारे लगावण्याची हुक्की येऊन ते काम त्यांनी पार पाडले. राजकारणाचे सांगोपांग स्वरूप ‘ काय जाणती गव्हारे ’ असे एक समर्थांचे वचन आहे. “ यातला गव्हार हा शब्द माझा नाही बरें. समर्थांनी राजकारणाबद्दल शंका घेणारांना अनुलक्षून त्याचा वापर केला आहे. शंकेखोराची संभावना समर्थांनी केलेली आहे. अशा गव्हाराविषयी सावध राहिले पाहिजे ” वगैरे आशयाचे लहानसे चऱ्हाट वळले.

## व्यवहारचातुर्य व राजकारण

महाराष्ट्रात समर्थांच्या पद्धतीची भाषा वापरून विषय काही नसला तरी किंवा विषयान्तराने तासन् तास श्रोत्यांना बसल्या जागी खिळून ठेवणाऱ्या एका प्रसिद्ध वक्त्याची गाठ पडली तेव्हा त्याने Politics म्हणजे नऊ दशांश व्यवहारज्ञान (common sense) ही इंग्रजी म्हण पुढे दामटून या म्हणीच्या तात्पर्याने रामदासांच्या राजकारणाचा अर्थ लावला पाहिजे. पोलिटिकल आत्याबाई असा लेख केसरीने आपल्या सुरवातीच्या काळात वापरला आहे. हा इसम मोठा पोलिटिकल आहे असे आपण एखाद्याबद्दल म्हणतो ना. अशा प्रयोगाकडे लक्ष देऊन समर्थांचा राजकारण शब्द पारखला पाहिजे. सदर पुरुषाला गैरलागू विधाने करून लोकांना भ्रमात टाकण्याची व त्यायोगाने रमविण्याची हातोटी अंगवळणी पडलेली आहे. पॉलिटिक्सविषयी त्याची वरील व्याख्या ऐकून पोलिटिकल शब्दाचे दोन्ही प्रयोग धूर्तवाचक आहेत, अत एव ते व्यवहारकुशलतेत पडतील. नऊदशांश कॉमन सेन्स ज्या एकदशांशाच्या भरतीने राजकारण ठरते, त्या एक दशांशाचे स्वरूप विशद करून समर्थांच्या राजकारणात तो अंश कोठे कसा आला आहे, हे समजावून द्या, असा समर्थांच्या राजकारणाला व्यवहारचातुर्य ठरविणाराने म्हटल्यावर त्या व्यक्तीने आपल्या खड्या आवाजाला तार सप्तकात चढवून “ व्यवहारचातुर्य हा शब्द समर्थांना ठाऊक नव्हता की काय? त्यांनी राजकारण हा शब्द का योजावा हे काहीच कसे विचारात घेत नाही ” अशा प्रश्नांची गर्जना केली. ओक्साबोक्षी ओरडल्याने फार तर तसे करणाराचे नरडे बळकट असल्याची खात्री पटेल पण वादातल्या मुद्याचे समाधान नव्हे. “ आवाजाच्या अकाळविकाळ उंचीबद्दल आपणास अजिंक्यपत्र देण्याची तयारी आहे. पहाडी आवाज कुणाचा हा प्रश्न नाही. ” अशी त्या आवाजाची प्रशंसेने वासलात लावून पुनः कंठाचा खणखणाट ऐकवायला ते तयार होणार नाहीत, अशी त्यांची अवस्था पाहून “ समर्थांनी एकाच निश्चित अर्थाने आपले शब्द सर्वत्र वापरलेले नाहीत. एकाच अर्थाचे

विविध शब्द त्यानी उपयोगात आणलेले आहेत. राजकारण या शब्दाचा जो अर्थ आजच्या व्यवहारात रूढ आहे तो अर्थ त्यांच्या मनात असता तर पहिल्या समासातील विषयानुक्रमणिकेत त्यानी राजकारण हा शब्द चातुर्याजवळ ठेवून त्याबद्दल शंकेस जागा राहू दिली नसती. ज्या ग्रंथांची संमति घेतली ते सारे अध्यात्मविद्येचे ग्रंथ आहेत. शुक्रनीति, कामंदकी-नीति, महाभारतातील राजधर्माचे पर्व इत्यादिकासारख्यांचा दासबोधात कुठेही चुकूनदेखील निर्देश दिसू नये. असे का ?" याप्रमाणे उलट प्रश्न विचारताच "म्हणूनच माझे म्हणणे असते की या विषयाचा अधिक विचार व्हायला पाहिजे." अशा उत्तराने चर्चा आटोपली.

## समर्थविषयक वृथाभिमान

धुळ्याचे देव जांबच्या समर्थमंदिरासाठी पैसे गोळा करायला मुंबईस आले तेव्हा त्यांचा प्रतिस्पर्धी देणग्यासाठी त्यांच्या बरोबर ठिकठिकाणी फिरत होता. या दोघांना एकत्र पाहून पुष्कळजण त्याना ऐकू येतील अशा रीतीने बोलत की नियतकालिकातून हे दोघे एकमेकाला यथेच्छ शिव्या घालतात आणि लोकांचे खिसे हलके करायला मात्र हे दोघे जोडीने येतात. या द्रव्यार्जनाच्या संचारात काही अनुभव विलक्षण होते. एकदा एका मोठ्या व्यापारी संघटनेच्या सभासदांना देव भेटले. त्यानी समर्थांचे अद्वितीय माहात्म्य वर्णून पैशाची अपेक्षा उचारली आणि अवघे दोन रुपये मिळाले. देवांनी अधिक प्राप्तीकरिता अनेक प्रकारे विनवण्या केल्या, पण दोन रुपयावर एक छदामसुद्धा जास्त हाती पडला नाही. महाराष्ट्राला समर्थांचा अभिमान असल्याचा हा एक मासला सांगितला. आणखी एक मासला नमूद करण्याच्या लायकीचा आहे. मुंबईच्या मुक्कामात एकदा बड्याबड्या पुस्तकविक्रेत्यांना बोलावून देवांनी समर्थवाङ्मयाच्या विक्रीची शोचनीय कथा निवेदन केली. समर्थांच्या स्फुट कवितांचे पुस्तक छापून २५ वर्षे लोटली. पाने ५०० इतकी. किंमत अत्यल्प. पण तीन हजार प्रतींपैकी दीड हजार प्रती शिल्लक आहेत. त्या कोणीतरी दीड हजार रुपये देऊन विकत घ्याव्या, असे त्या कथेचे स्वरूप होते.

## तीन दंडधारी रामदासी

याप्रमाणे टीका प्रतिटीकेची दंगल चालू असता एका सकाळी (१९३० मध्ये) नऊ दहा वाजण्याच्या सुमारास तीन दाढीवाले कफनीधर बुवा नवाकाळ कचेरीत येऊन रामदासी वाद उपस्थित करणाराचे नांव घेऊन चौकशी करीत त्याच्या खोलीत शिरले. तिघांच्या ह्याती लहानमोठे सोटे होते. त्यांच्या चौकशीत आवेश पाहून त्यांना वादकर्त्याच्या खोलीपर्यंत आणून सोडणाऱ्या नवाकाळच्या कामगाराला त्यांच्याबद्दल संशय आला, व त्याने आपल्या एकदोन सहकाऱ्यांना बरोबर घेतले. खोलीत शिरताच 'अमूक ते तुम्हीच का' असा प्रश्न विचारून 'होय तोच मी' हे उत्तर ऐकताच सोटे नीट हाती धरून 'तुम्ही आमच्या समर्थांची काय नालस्ती चालविली आहेत' असा दुसरा प्रश्न जास्त उंच आवाजात दरडावणीसारखा विचारला. तेव्हा जबाब देणाराने उभा राहून त्यांना बजावले की, 'जरा मागे नजर टाकून पाहा." त्या रामदासी बुवांची पाठ कंपोजिंग खात्याकडे होती. ते खाते अगदी जवळच होते. दाढ्या, सोटे, आत शिरण्याचा ढंग व प्रश्न विचारण्याची तऱ्हा, या कारणांनी १०–१५ कंपाझिटर खोलीच्या दाराशी येऊन उभे राहिले होते. आणखी चार सहाजण वेडावाकडा प्रसंग उद्भवल्यास त्याला पुरून उरण्याच्या तयारीने खोलीकडे सावकाश येत होते. रामदासीबुवांनी मागे वळून जेव्हा हा जमाव पाहिला व 'तुमच्या सोट्याचा पहिला घाव माझ्यावर पडतो न पडतो तोच तुम्हा सर्वांची काय दशा होईल त्याचा विचार आधी करा आणि मग जो संकल्प असेल त्याला हात घाला' असे थंड



अनुक्रमणिका






आवाजात ज्याकडून जबाबाची अपेक्षा त्याने बुवांना बजावले. बुवांच्या मनात काय करावयाचे होते हे निश्चित सांगणे कठिण आहे, पण त्यांची शारीरिक हालचाल मारामारी सुचविणारी होती. ही हालचाल उसन्या किंवा अगदी माफक अवसानाची होती, याची अटकळ कठिण नव्हती. पाठीमागे छापखान्यातील माणसांचा घोळका पाहून त्यांचा नूर पालटला. नंतर दोन तीन मिनिटांनी 'बसा' असे म्हणताच ते तिघेही समोरच्या खुर्च्यांवर बसले. मग जी प्रश्नोत्तरे झाली त्यावरून वाचकांना वस्तुस्थितीचा बोध होईल.

"समर्थांची नालस्ती तुम्ही कुठे पाहिली किंवा ऐकली ? समर्थांची शपथ घेऊन जे खरे असेल ते सांगा."

बराचवेळ त्या बुवांचे तोंड उघडेना तेव्हा 'तुम्ही मासिके, वृत्तपत्रे, वगैरे वाङ्मय वाचता कां ? असा प्रश्न केला. त्याला मात्र 'नाही' असे उत्तर मिळाले. "आम्ही शहरापासून दूर काहीशा आडगावी राहाणारे लोक. मासिके वृत्तपत्रे आम्हाला कशी मिळावी, शिवाय वर्गणी भरून घेण्याची आम्हाला ऐपत नाही. आमचे शिक्षण अक्षरओळख, कामापुरती आकडेओळख एवढेच आहे. नित्य दासबोध वाचावा, मठातील देवदेवतार्चन करावे, अशारीतीने आम्ही आयुष्य सारतो. सुमारे पंध्रवड्यामागे धुळयास गेलो होतो. तेथे नानासाहेब देवांशी काहीना काही बोलणे चाले. एकदा त्यांच्या बोलण्यात मुंबईत एकजण समर्थांची निंदा करीत असतो. तुम्ही समर्थांच्या नावाने त्यांच्या कृपेचे अन्न खाता, पण अन्नदात्याच्या निंदेची तुम्हास दाद नसावी, यापरते संप्रदायाचे दुर्दैव ते दुसरे काय असणार ? मुसलमानात जसा आपल्या पैगंबराबद्दल कडवा अभिमान असतो, तसा जर समर्थांबद्दल तुम्हा सांप्रदायिकात अभिमान असता तर कुणाची माय व्याली असती समर्थांच्या निंदकाला. पण तुमच्यात स्वाभिमान असेल, सत्त्व असेल तर या बोलण्याचा उपयोग. तुमच्यात हिंमत असेल, कुवत असेल तर जा मुंबईला आणि घ्या त्या निंदकाचा समाचार-समाचार असा घ्या की त्याचे महाराष्ट्रात नगारे वाजले पाहिजेत."

तुम्हाला मुंबईस घडणाऱ्या निंदेचा काही तपशील धुळयाच्या देवांनी सांगितला का ?"

"निंदा, भयंकर निंदा, तिचे स्मरणदेखील पाप, महापाप-त्या निंदेला सुमार नाही. खरे दुःख निंदेचे नाही तर तुमच्यासारखे सांप्रदायिक ती निंदा मनावर घेत नाहीत हे आहे. देवांच्या व आमच्या धुळयाच्या मुक्कामात तीन चारदा स्वस्थपणे भेटी झाल्या त्यात देव असे तळमळून वारंवार बोलत. निंदेचा तपशील मुळीच सांगितला नाही."

"निंदा राहो, पण वादाचे मुख्य मुद्दे तरी देवांनी स्पष्ट केले का ?"

"त्यांची पण आम्हाला कल्पना नाही."

"तर मग मी सांगतो. रामदासांचे राजकारण म्हणजे राजकीय उलाढालीचे कर्तृत्व किंवा शास्त्र नव्हे. त्यांचा शिवाजी महाराजांच्या स्वराज्यकार्याशी संबंध नव्हता. महाराजांची व स्वामींची भेट आयुष्याच्या अखेरीअखेरीच्या वर्षात झाली. वादाचे हे दोन मुद्दे मुख्य आहेत. याला वादाच्या ओढाताणीत फाटे फुटले आहेत."

"समर्थांनी शिवाजीमहाराजांच्या कारभारात सल्लामसलत दिली असे आम्ही सांप्रदायिक तरी कुठे मानतो. ज्ञानेश्वर-एकनाथासारखे ते एक सत्पुरुष होते, भक्त होते, मात्र श्रीराम हे त्यांचे दैवत, पंढरीचा विठोबा नव्हे. त्यांची शिकवण भजनमार्गाची होती. आमच्यात अशीच समजूत परंपरेने चालत आहे."

निंदकाच्या समाचारास आलेल्या त्या परंपरागत मठस्थ सांप्रदायिकांनी केलेले हे स्पष्टीकरण ऐकून त्याला देवांच्या मते निंदक ठरलेल्याकडून







उत्तर मिळाले की, देव त्याना शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यसाधनाचे सूत्रधार म्हणतात व त्याचा अनुवाद करणारे पुष्कळ शिकलेले लोक आहेत. ज्याचा समाचार घेण्यासाठी तुम्ही आला, त्याचे म्हणणे अगदी तुमच्यासारखे आहे, पाहिजे तर तुम्ही वादाचे लेख वाचा."

या उत्तरांने तिघे बुवा चकित झाले. "तर मग देवांनी आम्हाला खोटे सांगितले म्हणायचे." "होय चक्क खोटे सांगितले. खोटे का खरे हे तुम्ही दोन्ही बाजूचे लेख पाहून ठरवा." त्यांच्या हाती विज्ञाविस्ताराचे अंक दिले. तिघानी त्यांची पाने मागे पुढे हालविली आणि हे लेख सांगोपांग समजण्याची शक्ति आमच्या बुद्धीत नाही असे प्रांजळपणे कबूल करून त्यानी ते अंक समोरच्या टेबलावर ठेवले.

## समर्थसंप्रदायातील हीन कारस्थाने

ते बुवा तीन ठिकाणच्या लहान लहान मठांचे चालक होते. पटाईत गुंड नव्हते, अशी खात्री पटण्याला वेळ लागला नाही. देवांनी त्यांच्या ठिकाणी जे भ्रम पेरले, त्यांच्या आहारी जाऊन ते संतापले होते. त्यांचा संताप थंडावल्यावर त्याना कोण कुठले असे प्रश्न विचारले व त्यानी आपली नावे गावे मोकळेपणाने सांगून टाकली. देवांच्या लिखाणातील त्यांच्या मठांची जुनी माहिती देवकल्पित निंदकाच्या तोंडून ऐकल्यावर ते प्रसन्न झाले. त्यापैकी एका मठाच्या मूळ पुरुषाने आपल्या देहशक्तीचे भक्तिमूलक असामान्य प्रदर्शन करून प्रत्यक्ष मारुतीची शाबासकी मिळविली व शाबासकीसाठी मारुतीने त्याच्या पाठीवर मारलेल्या थापेची खूण लाल पंजाच्या रूपाने उमटलेली मरेपर्यंत सर्वांना मारुतीच्या कृपेची साक्ष पटवीत होती वगैरे चमत्कारकथा ऐकून त्यांना निंदकाच्या माहितगारीचे कौतुक वाटले. नंतर मुंबईत कुठे कुणाकडे उतरला, जेवणाखाणाची काय सोय आहे वगैरे विचारपूस चालविली. तो दिवस एकादशीचा होता. त्यांच्या रहाण्याजेवण्याची सोय विशेष समाधानकारक नव्हती. एकादशीच्या फराळासाठी निमंत्रण बोलताच त्यांनी ते स्वीकारले व ते गेले. १२-१ वाजण्याच्या सुमारास येऊन त्यांनी यथेच्छ पोटभर एकादशीचे उपोषण साधले व फराळानंतरच्या संवादात टाकळीच्या तरुण ब्रह्मचारी मठपतीला चाफळच्या मुख्य स्वामीकडून समर्थांचे निरनिराळे मठ घशात घालण्याच्या खटपटीत असलेल्या एका कारस्थानी रामदासीबुवाने लग्न करण्याची परवानगी कशी मिळवून दिली, त्या टाकळीकराने गृहस्थाश्रम स्वीकारताच तो मठ ब्रह्मचाऱ्याचा या परंपरेच्या आधाराने गृहस्थाश्रमी म्हणून त्याला मठातून घालविण्याचे प्रकरण कोर्टात कसे गेले, वगैरेचा पाढा त्या बुवांनी वाचला. समर्थसंप्रदायात स्वार्थी प्रेरणेची कारस्थाने समर्थ गेल्या दिवसापासूनच सुरू झाली होती, तेव्हाचा कपटाचार थांबलेला नाही तर उलट वाढलेला आहे एवढेच तात्पर्य त्या बुवांच्या माहितीमधून हाती लागले. ही माहिती मनोरंजक व बोधप्रद असली तरी तिचा प्रत्यक्ष वादाशी संबंध नसल्याने ती येथेच सोडून देणे बरे. मागे धुळ्याच्या साप्ताहिकातील चिथावणीच्या लेखाचा निर्देश केला होता. तो लेख आपला नव्हे असे कालांतराने चौकशी केल्यावेळी देवांनी सांगितले; तथापि चिथावणीचे विचार धुळ्यातील समर्थभक्तांच्या बैठकीत चघळले जात असावे याचे प्रत्यन्तर वर उल्लेखिलेल्या रामदासी बुवांच्या वर्तनात स्पष्ट दिसणारे होते. त्या बुवांनी देवांचे नांव घेतल्याचे त्यांच्या कानी घातले तेव्हा देव कानावर हात ठेवून मोकळे झाले. ते बुवा स्वभावतः निरुपद्रवी म्हणून त्यांनी मनात आणलेला अतिप्रसंग टळला.

## महाराष्ट्रधर्म

समर्थांनी राजकारण हा शब्द आपल्या वाङ्मयात निदान पन्नास वेळा तरी आणलेला आहे. महा-











राष्ट्रधर्म हे ज्याचे संस्कृत तो मऱ्हाट शब्द अवघ्या दोन वेळाच कामास घेतला आहे. पण हे संस्कृत रूप वादाचा विषय बनले आहे. प्रथम त्या शब्दाचा विचार म. गो. रानड्यांनी केला व लोकांसमोर ठेवला. तो विचार चुकीचा असे सिद्ध व्हावे म्हणून राजवाडे आपली कल्पकता मरेपर्यंत राबवीत होते. १९२६ मध्ये ते निधन पावले. साताऱ्च्या एका मासिकात त्यानी १९२४ मध्ये याच विषयावर लेख लिहिला आहे. धुळ्याचे तात्यासाहेब भट यानी त्यावर एक धष्टपुष्ट ग्रंथच लिहून ठेवला आहे. मऱ्हाट धर्म असा मूळ शब्द असल्याने तो मऱ्हाट्यांचा अर्थात् मराठी जन्मभाषेच्या हिंदूंचा धर्म असा अर्थ निघतो. रानड्यांच्या भाषणलेखन संग्रहात देशभक्तीचा धर्म ( रिलिजन ऑफ पेट्रिऑटिझम ) असा अर्थ केल्याचे पहायला सापडते. राजवाड्यांचा काथ्याकूट बारकाईने तपासल्यास ते अर्थाच्या दृष्टीने रानड्यांच्या जवळ दिसतात. पण देशभक्तीच्या तटवारीने विद्वत्तेला मान्यता देण्याचा एक अनिष्ट प्रघात महाराष्ट्रात आढळतो. टिळक लोकमान्य म्हणून त्यांच्या गोटातले जे कोणी विद्याप्रेमी ते सारे विद्वान् अशी समजूत रूढ आहे. रानडे–टिळकांचे सार्वजनिक जीवनात फारसे सूत नव्हते. यामुळे रानडे व त्यांचा तट कमी प्रतीचा लेखला जाण्याची विचारसरणी महाराष्ट्रात बळावली. राजवाडे हे टिळकांच्या सरंजामातले, टिळकांच्या चिरसांन्निध्यात नसले तरी इतिहासाच्या क्षेत्रात रानड्यांचे विरोधी एवढे कारण त्यांच्या मताची तळी उचलून धरू इच्छिणारांना पुरते. मग रानड्यांचे मूळ म्हणणे काय आहे व रानड्यांनी खंडन केले म्हणजे काय केले, याची माहिती साफ नसली तरी राजवाडेभक्तांना चालते. मूळ शब्दाच्या रूपाकडे लक्ष दिल्यास रानडे – राजवाडे हे दोघे त्या शब्दाचा विचार न करता अर्वाचीन काळातील एका नव्या शब्दाचा अर्थस्फोट करीत होते, असे कळण्याला अडचण नाही. पण त्या रूपांतर पावलेल्या शब्दाला रामदासांच्या महतीमध्ये स्थान मिळाल्यामुळे राजकारणाच्या खालेखाल त्याची कास धरीत असत. कित्येकजण महाराष्ट्रधर्मे समर्थांच्या राजकारणाला पोषक असल्याची बतावणी करीत होते. राजकारणाप्रमाणे महाराष्ट्रधर्माची विशेष घासाघीस झाली नाही. येथे हे नमूद करणे अवश्य आहे की मऱ्हाटचे महाराष्ट्र हे रूप समर्थांच्या पश्चात् कागदपत्रातून शिरलेले आहे. ते रूप समर्थांच्या मऱ्हाटधर्माहून वेगळया अर्थाचे वाचक आहे. एकाचा रोख सामान्य प्रचलित हिंदु धर्माच्या बोधाचा आहे तर दुसऱ्याचा शिवाजीमहाराजांनी स्वराज्य उभारताना आपल्या प्रजेसाठी अमलात आणलेल्या नीतीचा आहे. क्वचित् महाराष्ट्रधर्म वादात ओढला गेला, त्यावर तुंबळ माजले नाही.

रामदासी वादातील बरेच ठळक स्वानुभव सांगितले. अजून या वादाच्या ठिणग्या उडताना दिसतात, त्या बारीक असल्या तरी वादाचा निखारा कुठेना कुठे तरी धुमसत असल्याच्या खात्रीला त्या पुरेशा आहेत. पुढे आपण जांबच्या समर्थमंदिरस्थापनेच्या सोहळयातील गमती पाहू. प्रत्यक्षवादाशी त्या सोहळयाचा संबंध नसला तरी तो प्रसंग वादकाळातला आहे. नानासाहेब देवांनी त्या सोहळ्याच्या हकीकतीचे एक चोपडे प्रसिद्ध केलेले आहे. तेथे सोहळयासाठी गेलेल्यापैकी पुष्कळांचे अनुभव त्या चोपड्यात नाहीत. पण त्या अनुभवात स्वारस्य किंवा बोध नाही, असे मात्र म्हणणे वा समजणे चुकीचे होईल.

## परिशिष्ट

देवांनी डोमगांव येथील समर्थशिष्य कल्याणस्वामीच्या हस्तलिखित दासबोधाची प्रत प्रथम प्रसिद्ध केली ( इ. स. १९०५ ) तेव्हाच वारकरी संत श्रेष्ठ की समर्थ श्रेष्ठ हा वाद सुरू झाला होता. त्याची पूर्वतयारी राजवाड्यांनी आपल्या लेखातून वारकरी








संतांनी देश बुडविला या सिद्धान्ताच्या घोषणेने करून ठेवली होती. देवांच्या दासबोधावर अभिप्राय देताना पुण्यातील लोकप्रियतेमध्ये केसरीला मागे टाकणाऱ्या एका साप्ताहिकाच्या संपादकाने दासबोध म्हणजे गुलाम बनलेल्या जनतेला स्वतंत्र होण्याची प्रेरणा देणारा बोध असे त्या ग्रंथाचे अंतःस्वरूप वर्णिले होते. त्यानंतर महाराष्ट्राच्या स्वातंत्र्येच्छु जनतेचे राष्ट्रीय तीर्थस्थान 'पंढरी का परळी' अशी चर्चा पुढे आली. ओघानेच आज देशाला धारकरी पाहिजेत, का वारकरी नकोत हा प्रश्न उद्भवला. समर्थांचे सांप्रदायिक हे धारकरी आणि ज्ञानेश्वरादिकांचा पंथ चोखाळणारे जे वारकरी, त्यांची देशाला आवश्यकता नाही, अशा तऱ्हेची भाषा बोलली जाऊ लागली. समर्थांनी मारुतींची स्थापना करून बलोपासना शिकविली आणि धनुर्धारी राम हे उपास्य स्वीकारून स्वातंत्र्यप्राप्तीला शस्त्रे हवी असल्याचा धडा घालून दिला. वारकऱ्यांचा कमरेवर हात ठेवणारा विठोबा हा 'न स्त्रीपुमान्' कोटीतला, अशी विधाने सार्वजनिकरीत्या उच्चारण्यापर्यंत कित्येक विद्वानांची मजल गेली. हा धुमाकूळ चांदोरकरांना शिव–समर्थांच्या पहिल्या भेटीसंबंधाचे पत्र सापडण्यापूर्वीचा आहे. ते पत्र प्रसिद्ध झाल्यावर भडकलेल्या वादाचे कथानक संक्षेपाने मागल्या व आताच्या लेखात गोवले आहे.












अनुक्रमणिका

दि. के. बेडेकर

# बळिराजाचे व्यथित मानस

दिवाळीच्या सणाशी बळीराजाचा फार घनिष्ट संबंध आहे. बळीची कथा सर्वांना ठाऊक आहे, ती अशी की तो बलाढ्य राजा होता, पण भोळा होता. वामनाने येऊन त्याला तीन पावले जमीन दान मागितली. त्याने ती देऊन टाकली, पण वामनाच्या एका पावलाने स्वर्ग व्यापला, दुसऱ्याने पृथ्वी व्यापली व तिसरा पाय बळीच्या डोक्यावर देऊन वामनाने बळीला पाताळात दडपला. या कथेत एक तपशील असाही असतो की वामनाच्या 'तीन पावलांचा' खरा व्याप बळीच्या गुरूला म्हणजे शुक्राचार्याला आधीच कळला व बळीने ते अचाट दान देऊ नये म्हणून आचार्यांनी प्रयत्न केला; दानाचे उदक सोडण्याच्या झारीत आचार्य जाऊन बसले, पण वामनाने त्या झारीच्या नळीत काडी घातली वगैरे.

कथा म्हटली की तिच्या स्वरूपात सारखे बदल होत जातात; तपशील, भेसळ, चमत्कार यांची गल्लत होत पौराणिक कथा वाढत जातात. पण, या कथांच्या मागे कोठे तरी काही तरी एक बीज असते. ते शोधून काढणे शक्य असते का ?

## पुराणकथातील अलौकिकत्व

तसे पाहिले तर बळीराजाच्या कथेचे मूळ शोधणे दुरापास्त नव्हे अशक्यच आहे. पण एक गोष्ट अशी आढळते की अनेक देशोदेशींच्या पुराणकथातून काही सारख्या घटना सापडतात. 'चौदा वर्षांचा वनवास' ही एक घटना घेऊ. रामचंद्रांनी असा वनवास भोगला, पांडवांनीही भोगला आणि ग्रीक व इतर पुराणातील अवतारी पुरुषांनीही तसाच तो भोगलेला आढळतो. सर्व देशातील पुराणग्रंथातून राम-सीता, पांडव-द्रौपदी अशासारखी अलौकिक माणसे आहेत. त्यांचा जन्म सामान्य माणसाप्रमाणे न होता अलौकिक तऱ्हेने झालेला आढळतो. सीता यज्ञभूमीत सापडलेली तर द्रौपदी यज्ञसंभवच आहे. या साऱ्यांचा मृत्यूही साधा नसतो. रामचंद्र समुद्रात प्रवेश करतात. सीता भूमीत नाहीशी होते; पांडव व द्रौपदी हिमालयात नाहीसे होतात. बळीराजाचे पाताळात जाणे असेच अलौकिक आहे.

## अभिनिवेशांची भर

पुराणातल्या गोष्टी म्हणजे काहीतरी हरदासांनी बनविलेल्या भाकडकथा आहेत अशी समजूत इंग्रजी अमलाच्या प्रारंभी आपल्याकडे झाली. ही समजूत आपल्या सुधारकांची. याच्या उलट सनातनी लोकांनी असे म्हणायला सुरुवात केली की, पुराणे म्हणजे भाकडकथा नाहीत तर तो प्रत्यक्ष घडलेला इतिहासच आहे. महाभारत व रामायण यांना महाकाव्ये असे रूढीने मानलेले आहे. इतर बाबतीत रूढीला शिरोधार्य मानणारे हे लोक या बाबतीत रूढीच्या विरुद्ध महाकाव्यांना इतिहास म्हणू लागले. सुधारक व सनातनी यांच्यातला संघर्ष बहुतेक साऱ्याच बाबतीत असा काही झाला की साधे सत्य शोधण्याचा प्रयत्न बाजूला पडला आणि नुसते अभिनिवेशांचे तुमुळ युद्ध होत राहिले. युरोपीय पंडितांनी याच युद्धात भाग घेतला व कोणी या तर कोणी उलट अशा अभिनिवेशाला भर दिली.

## कथातील बीजे

रामायण महाभारत ही महाकाव्ये किंवा आणखी साऱ्या देवांच्या व असुरांच्या पुराणकथा यांच्यामागे मानवी प्रज्ञेचा काही तरी खोलवर रुजलेला आविष्कार आहे असे प्रथम मानायला हवे. दुसरे असेही मानणे इष्ट आहे की या कथांच्या मागे नुसती भाबडी कल्पनाशक्ती नसून काही तरी भक्कम पायावर उभे असे सत्य आहे. ते सत्य केवळ भारतीय पुराणकथांच्याच मागे नाही तर प्राचीन मानवांच्या देशोदेशींच्या कथांच्या मागेही आहे. एकाच अतिप्राचीन, अलिखित व अत्यंत मूलगामी अशा सत्याचे बीज साऱ्या प्राचीन पुराणकथांच्या जगभर पसरलेल्या शाखोपशाखांच्या बुडाशी आहे. इलियड व रामायण यात साम्य दिसते, किंवा जगप्रलय झाल्यावर मत्स्यरूपाने देव येऊन एका मानवाला वाचवितो ही कथा साऱ्या जगभर दिसते. यात उसनवारीचा प्रश्न नसून एका सत्याच्या, बीजाच्या, विस्तारात दिसणारे हे शाखांचे साम्य आहे. देशोदेशींच्या पुराणकथातून जे फरक दिसतात ते या विस्ता-








राच्या वेळी झालेले संस्कार आहेत. आता, पुराणातल्या कथांना नाके मुरडणेही बरोबर नाही व त्यांना इतिहास मानणेही योग्य नाही. या कथांच्या मागे अतिप्राचीन मानवाच्या मनाचा ठाव घेण्यासाठी काही बीज गवसते काय ते पाहिले पाहिजे.

## बळी, यम, यज्ञपुरुष

बळीच्या कथेला बळीराजाच्या उदारपणाचा व भोळेपणाचा मुख्य आधार आहे. हा उदारपणा सर्वस्व गमाविणाऱ्या धीरोदात्त पुरुषाचा उदारपणा आहे. क्रीडासाठी, वचनपूर्तीसाठी किंवा एखादा पण जिंकण्यासाठी प्राण गमाविण्यास तयार असणारे बळी, हरिश्चंद्र किंवा असेच पुराणकथेतील पुरुष पाहिले म्हणजे या साऱ्यांच्या मनोरचनेतील साम्य विलक्षण आहे हे सहज लक्षात येते. यांच्या कथा वेगवेगळ्या आहेत पण यांच्या सर्वांच्या मानसिक घडणीत जे साम्य आहे त्यावरून वाटू लागते की या साऱ्यांच्या मागे कोठे तरी एक बीजरूपाने वसणारी व्यक्ती आहे. मानवी मनाने कल्पिलेली व प्रत्यक्ष आचरणाने घडविलेली अशी एक व्यक्ती आहे की ती आपला प्राण अर्पण करण्यास सहज पुढे होते. अशा व्यक्तीचा उल्लेख यमसूक्तात येतो. ती व्यक्ती म्हणजे स्वतः यमच. दिवाळीत बळीबरोबरच यमाचीही आपण आठवण करतो हे लक्षात घेण्यासारखे आहे. यम हा मृत्यूचा देव मानला आहे व तो इतरांना मरण देतो खरे, पण मुळात असे आहे की यम हा आपल्या शरीराचे बलिदान करतो; मृत्यूला आपण होऊन कवटाळतो. जो स्वतः मृत्यूला जवळ करतो तोच मग मृत्यूचा देव बनतो.

यमाने व त्याच्याबरोबर त्याच्या बहिणीने ( यमीने ) स्वतःच्या प्राणांचे बलिदान केले असे यमसूक्तात म्हटलेले आहे. हे बलिदान कशासाठी ? तर 'जनानां संगमनाय', म्हणजे मानवानी एकजीव सहजीवन जगावे म्हणून. हे प्राणाचे बलिदान यमाने केले ते एखाद्या लढाईत केले नाही, तर एका यज्ञात केले; किंबहुना यज्ञ म्हणजे असे बलिदानच. या ठिकाणी मानवी संस्कृतीच्या प्राचीनतम स्तरांच्या अभ्यासाचा व शास्त्राचा प्रश्न येतो. वेदकाल किंवा प्राचीनतम ईजिप्शियन सम्राटांचा काल हा अगदी अलीकडचा व 'आधुनिक' मानावा लागेल, इतक्या प्राचीन कालाकडे दृष्टी टाकली तरच मानवी मनाचे काही आविष्कार कल्पिता येतील. अशा आविष्कारांचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रज्ञांपैकी अनेकांनी ही गोष्ट आता मान्य केली आहे की 'यज्ञ' ही प्रथा फारच पुरातन आहे व तिला 'आधुनिक' रूप येत येत अश्वमेध किंवा अशीच इतर रूपे आली आहेत. पण पशूंच्या यज्ञात ज्याचे परिवर्तन झाले तो मूळ यज्ञ हा पुरुषयज्ञच होता, -पुरुषाच्या जागी हळूहळू अश्व, अज इत्यादि पशू केवळ प्रतिनिधि म्हणून आले. यमसूक्तातील प्राणार्पणाचा उल्लेख किंवा भारतीय यज्ञवाङ्मयातील व कथातील नरमेधाचे उल्लेख हे प्राचीनतम अशा पुरुषमेधाचे अवशेष आहेत. पुरुषमेध हाच मूळचा यज्ञ होय.

## यज्ञपुरुष हाच राजा

वेदातील ऋचा रचणारे आर्य सामर्थ्यवान व युद्धकलेत प्रवीण तर होतेच, पण शिवाय राजा, पुरोहित प्रभृती शासकांच्या अनुशासनाने संघटित झालेले होते. ज्याला आपण आज ज्ञात इतिहासकाल म्हणू त्या कालातील सर्वच जेते व पराजितही असेच सुसंघटित होते. 'अराजक' टोळ्यांनी राहणारे लोक रानावनातून कंदमुळे खात व पारध करीत जगत होते, पण त्यांनी राजकीय किंवा सांस्कृतिक इतिहास घडविलेला नाही. 'गणराज्ये' म्हणून नांदणारे लोकही अराजक पद्धतीने नांदत नव्हते, उलट त्यांचे जीवन शासक कुलांच्या अनुशासनाने बद्ध होते असे लिच्छवी व इतर गणांच्या प्रत्यक्ष वर्णनावरून दिसते. सारांश, प्राचीनतम काळात जे जे लोक शासक किंवा जेते म्हणून उदयाला आले ते 'राजा' या संस्थेला मानणारेच होते. 'राजा', त्याचे संरक्षक ( म्हणजेच क्षत्रिय ) आणि पुरोहित याची प्रत्यक्ष निर्मिती ज्ञात अशा मानवी इतिहासाच्या फार पूर्वी झाली व ही सारी संस्था ज्या मानवी समूहांनी स्वीकारली व तिचा उपयोग केला तेच प्राचीन जगात नावारूपाला आले.

'राजा' ही संस्था इतकी प्राचीन आहे ही गोष्ट प्राचीन मानवसंस्कृतीच्या अभ्यासकांनी मान्य केलेली आहे. 'यज्ञ' ही संस्था अतिप्राचीन आहे व 'राजा'ही तसाच आहे. मग या दोघात संबंध असेल का ? या सहज सुचणाऱ्या प्रश्नाचे उत्तर अस्तिपक्षी द्यावे लागते. निदान पुष्कळ शास्त्रज्ञांचे असे मत आहे



अनुक्रमणिका






की, 'राजा' म्हणजे दुसरा कोणी नसून यज्ञाच्या बलिवेदीवर स्वतःचे प्राण अर्पण करणारा यज्ञपुरुषच होय. यज्ञाच्या बलिवेदीवर होणारे हे बलिदान कशासाठी होत होते? आपल्यातीलच एका प्रिय व्यक्तीला बलिवेदीवर चढून मृत्यूला कवटाळण्याचे दिव्य करणे भाग पडावे ही प्रथा मानवी मनाला पटली तरी कशी? या बलिदानातून मानवाने साधले तरी काय? या प्रश्नांची उत्तरे सोपी नाहीत. ही उत्तरे सापडणार कोठे? वेद इत्यादि सारे ग्रंथ हे अगदी 'आधुनिक' ठरतील इतक्या पूर्वी, वीस- पंचवीस हजार वर्षापूर्वी, कोठे तरी या पुरुषमेधाची प्रथा निघाली व ती साऱ्या मानवसमूहांनी स्वीकारली असे संभवते. तेव्हा या प्रथेच्या उगमाबद्दल वाङ्मय, शिलालेख वगैरे सापडणे अशक्यच. तथापि, या प्रथेची अवशेष रूपाने ओळख होऊ शकते. हे अवशेष अश्वमेधाच्या मंत्रात सापडतील, पुरुषसूक्त, यमसूक्त इत्यादि सूक्तातून सापडतील किंवा काही वन्य (व रानटी) मानलेल्या खोंड प्रभृती टोळ्यांच्या नरमेधाच्या प्रत्यक्ष चालू प्रथेतून सापडतील. असे हे अवशेष अभ्यासून प्राचीन मानवसंस्कृतीच्या अभ्यासकांनी काही महत्त्वाचे निष्कर्ष काढले आहेत. त्याना प्रमाण मानून या यज्ञपुरुषाच्या मानसिक अवस्थेबद्दल प्रस्तुत लेखात काही विवेचन मी करीत आहे.

## इच्छामरणी राजा

'जनानां संगमनाय', (म्हणजे आजच्या भाषेत लोककल्याणासाठी), बलिवेदीवर स्वखुषीने प्राणार्पण करणारा पुरुष हा लोकांनी आपला 'राजा' मानला. 'राजा' म्हणजे केवळ शासक नव्हे. महाभारतात 'राजा' ह्या संस्थेची निर्मिती कशी झाली याबद्दल अशी कथा आहे की मागे केव्हा तरी माणसे अगदी गुण्यागोविंदाने व दानतीने नांदत होती; माणसे माणुसकीने वागत होती. मग अचानक असे घडले की ती मात्स्यन्यायाने म्हणजे 'बळी तो कान पिळी' या तत्त्वानुसार वागू लागली; तेव्हा शेवटी सगळेचजण कंटाळले व भयग्रस्त झाले. यातून तोड काढणे अशक्य होऊन बसले. त्या काळात एक मार्ग नेहमी खुला होता तो म्हणजे ब्रम्हदेवाला (किंवा विष्णूला) शरण जाण्याचा. लोक ब्रह्मदेवाकडे गेले. या शिष्टमंडळात बलाढ्य 'मत्स्य'ही सामील झाले होते, किंबहुना तेच सर्वांच्या वतीने गेले असावेत! कारण असे की, ब्रह्मदेवाने असा उपाय सुचविला की तुम्ही 'राजा' निर्माण करा. तो साऱ्यांचे रक्षण करील. पण या 'रक्षणात' अशी गोम होती की अगोदर साऱ्या लोकांचे शासक व प्रजा असे दोन भाग पाडून ही व्यवस्था 'राजा' रक्षण करील असा राजधर्म ब्रह्मदेवाने घालून दिला. थोडक्यात म्हणजे मात्स्यन्यायालाच व्यवस्था बनविली. महाभारतातली ही कथा म्हणजे उघडच राजसत्तेच्या स्तुतीसाठी बनविलेली कपोलकल्पित कथा आहे.

यज्ञवेदीवर प्राण अर्पण करणारा राजा मात्र असा शासक नाही. तो बळी आहे. या राजाचा प्रथम अभिषेक होत असे व मग तो ठराविक काळ 'राज्य' करी. हा काळ एक वर्ष किंवा चार वर्षे असे असा पुरावा नरमेध करणाऱ्या टोळ्यांच्या प्रथा व इतर काही गोष्टींवरून मिळतो. हा ठराविक काळ संपला की त्या राजाचा बळी दिला जाई व नव्या राजाला अभिषेक होई. राजाचा बळी दिल्याने जमीन सुपीक होऊन धान्याची समृद्धी होते व राजा हाच पाऊसपाणी योग्य वेळी पाडतो अशा कल्पना प्राचीन मानवाने केल्या. या कल्पना म्हणजे आजचा कवी करतो तशा कल्पना नव्हत. त्यांचे स्वरूप कविकल्पनांपेक्षा वेगळे असून त्यांना 'धारणा' म्हणणे योग्य होईल. 'राष्ट्र' ही कल्पना आहे पण ती कविकल्पना नसून हजारोलाखो मानवांची धारणा आहे; जीवनाला तिचा आधार आहे व तिच्या रक्षणासाठी हजारो माणसे प्राण अर्पण करताना दिसत आहेत. मानवी जीवनाची, जीवनाला आधार असलेल्या कृषिकर्माची, या कर्माला आधार असलेल्या पावसाची व्यवस्था राजा करतो अशी ही प्राचीन धारणा आहे. हा राजा बळी जातो व बलिदानाने ही धारणा करतो, या अर्थानेही तो समर्थ आहे, बळी आहे. राजाच्या कृपेवर सारे मानवी जीवनाचे चक्र, नव्हे सृष्टीचेही चक्र, चालू आहे. या धारणेला अनुरूप असे चिन्ह राजचिन्ह म्हणून अस्तित्वात आले यात आश्चर्य नाही. 'चक्र' हे चिन्ह राजाचे प्रतीक आहे. तो चक्रवर्ती मानलेला आहे. या 'राजा'च्या धारणेतून, या राजाच्या बलियज्ञातून, देवांची कल्पना निघाली व म्हणून देवांना 'यज्ञसंभव' असे आपल्याकडे मानलेले दिसते. विष्णू म्हणजे हा राजाच. 'राजा' या कल्पनेतून व प्रत्यक्ष बलियज्ञातून







विष्णू, यम, इंद्र इत्यादि देवतांचा जन्म झाला. पुढे ह्या उत्पत्तीच्या सत्याला उफराटे रूप आले व राजा हा विष्णूचा अंश बनला. जे मूळ होते तेच अंशरूप बनले. या उलटापालटीच्या मागे मानवी मनाची विलक्षण सर्जनशीलता व अद्भुत अशी किमया आहे. तिच्याकडे न वळता आपण केवळ राजाच्या जीवनक्रमाकडे वळू.

## निष्काम व निष्क्रिय जीवनाचा शाप

अभिषेक झाल्यापासून यज्ञवेदीवर जाईपर्यंत राजा हा आपले जीवन कसे घालवीत असेल ? अमुक एका मुहूर्तावर आपण इच्छामरण स्वीकारणार आहोत याची जाणीव मनात ठेवून जगणाऱ्या या मानवाला काय वाटत असेल ? त्याच्या भोवताली कशा प्रकारची यंत्रणा सहजच रचली गेली असेल ? याचा विचार करीत असताना काही उपलब्ध ज्ञात गोष्टी डोळ्यासमोर ठळकपणे येतात. राजा अभिषिक्त झाल्यानंतर त्याच्या देहाचे संरक्षण ही लोकांची जबाबदारी होऊन बसते. त्यासाठी प्राचीन मानवांनी फार मोठी काळजी घेतलेली दिसते. राजाच्या भोवती प्रथम देहरक्षकांची सोय करण्यात आली, यांनाच क्षत्रिय म्हणता येईल. त्यांचे काम साऱ्या समाजाचे रक्षण करणे हे मागाहून झाले. पण मुळात ते राजाच्या देहाचे रक्षक होते. अश्वमेधाचा घोडा सोडल्यावर त्याचे रक्षण करणे व जरूर तेथे लढाया करीत जाणे हे काम क्षत्रियांचे होते हे आपण पाहतोच. हा अश्व वस्तुतः राजपुरुषच असतो. आणि त्याचा मेध किंवा बळी हा खरे म्हणजे राजाचा बळीच असतो, फक्त, अश्वाने प्रतिनिधि म्हणून राजाचे स्थान घ्यावयाचे असते. ( हे प्रतिनिधित्वच पट्टराणी व अश्व यांच्या संभोगक्रियेचा विधि अश्वमेधात असतो यावरून स्पष्ट होते. )

राजाच्या देहाचे रक्षण होईल याची तशीच त्याच्या योगक्षेमाची संपूर्ण जबाबदारी लोकांनी घेतली. राजा हा लोकांच्या प्रेमाचा व आदराचा एकमेव विषय बनला. उपलब्ध वस्तूंपैकी उत्तम वस्तू त्याला देणे हे समाजाने आपले ईप्सित मानले. त्याची दिनचर्या म्हणजे लोकांच्या प्रेमाचा स्वीकार करणे एवढीच होऊन बसली. क्षत्रिय त्याचे रक्षण करीत आणि पुरोहित त्याची दिनचर्या ठरवीत. आज कित्येक देवळातून देवाच्या काकडआरतीपासून तो रात्री देवाने झोपण्यापर्यंत सर्व सोहळे पुजारी करीत असतो. तो देव पाषाणाचा असतो व निमुटपणे सारे सोहळे भोगीत असतो. अगदी तीच अवस्था या जिवंत देवाची, म्हणजे राजाची होती. याला रक्षणकर्ते क्षत्रिय होते, उपचारांचे कर्मकांड करणारे पुरोहित होते व सेवेसाठी सेवेकरी पुरुष व स्त्रिया होत्या. खंडोबाचे वाघ्ये व मुरळ्या असतात, तसा प्रकार या 'राजाचा' होता. त्याच्या भोवताली ज्या स्त्रिया असत त्या कोठून जबरदस्तीने आणलेल्या नसत तर 'देवदासी' प्रमाणे राजाला अर्पण केलेल्या असत.*

हे सारे राज-जीवन बाकीच्या सामान्य जनांच्या जीवनापेक्षा अगदी वेगळे व कृत्रिम होते. ते एका अ-लौकिक व्यक्तीचे दिव्य व तेजोमय जीवन होते. सामान्यांच्या जीवनापासून ते अलग केलेले होते. सामान्य माणसे शेतीत राबत, पारध करीत, असुरक्षित रहात; पण आपल्या राजाला मात्र ते सुरक्षित ठेवीत व कष्टमय जीवनापासून अधांतरी ठेवीत. हे सारे प्रेमाने, आदराने व भक्तीने होई, सक्तीचा त्यात लेश नव्हता. पण असे हे जीवन राजाला, आणि त्याच्याच भोवती जगणाऱ्या क्षत्रिय- पुरोहितांना व सेवेकरी स्त्री-पुरुषांना, कसे वाटत असेल ? ते जीवन निष्क्रिय, अधांतरी व एका वेगळ्या जगातच अधांतरी व अलगद ठेवल्यासारखे होते. सामान्य माणसे किंवा प्रजा श्रम करीत, चिंतेत जगत होती. श्रमाचे फळ मिळावे या अभिलाषेने प्रत्येक क्रिया करीत होती. राजाचे जीवन श्रमशून्य होते. फलाची आशा ठेवण्याची त्याला गरज नव्हती, कारण आपोआप विनायास त्याला सारे काही अर्पण होत होते. आजचे पाषाणाचे देव निष्कामपणे देवळात असतात; तोच निष्कामपणा त्या जिवंत राजाच्या मनोवृत्तीत साठवला जात होता.

---

* राजाबरोबर त्याचे देहरक्षक आणि स्त्रिया मृत्यू पत्करीत असत ही गोष्ट ईजिप्तमधील राजांच्या थडग्यांतील प्रेतांवरून स्पष्ट दिसते. केरळमध्ये राजाबरोबर मरण्याची शपथ घेतलेले वीर असत. ही राजाबरोबरच्या सहगमनाची प्रथा सर्व संस्कृतींमधून रूढ दिसते.

## मृत्यूचे भय व त्यावर उपाय

राजाच्या जीवनाचे स्वरूप थोडक्यात वर सांगितले. निष्काम व श्रमशून्य; सर्व भोग मिळणारे व सर्वांचे प्रेम व आदर लाभणारे, हे जीवन एका अर्थी संपन्न होते, ते पुण्यवानाचे भाग्य होते. बलिदानाला तयार होऊन अभिषिक्त होणाऱ्या व्यक्तीला हे दिव्य जीवन प्राप्त झाले यात नवल नाही. त्या व्यक्तीचा त्याग दिपविणारा होता. प्राणाचे मोल देण्यास लागणारे असामान्य धैर्य व लोककल्याणाची पवित्र भावना त्या व्यक्तीने दाखविली होती.

पण अभिषेकापासून बलिदानापर्यंतचा राजाच्या जीवनातील विलक्षण काळ संपन्नतेने व कृतार्थतेने पूर्ण असला तरी त्यावर मृत्यूची गडद छाया सतत पसरलेली होती. एका मुहूर्तावर तो मृत्यूला जवळ करणार होता.

या मृत्यूचे राजाला भय वाटत असेल का ? का बलिदानाला तयार झालेल्या त्याच्या मनाला मृत्यूचे भयच वाटेनासे झाले असेल ? या बळीराजाच्या बरोबरच ज्यांचे जीवन व मृत्यूही निगडित होते त्या क्षत्रियांच्या व सेवेकऱ्यांच्या मनात मृत्यूचे भय नसेल का ? मानवी मनाचा थोडा विचार केला तर असे सहज कळून येईल की बळीराजा, त्याचे क्षत्रियगण व गणिका याना मृत्यूचे हे सतत स्मरण ग्रासीत असले पाहिजे. ह्या स्मरणात भय असले पाहिजे आणि या भयातून मुक्त होण्याचे उपाय चिंतणे हा त्यांच्या मनाचा एक निदिध्यास असला पाहिजे. हवे तेव्हा कोणालाही व कोणत्या तरी रोगाने किंवा अपघाताने उचलून नेणारा मृत्यू या दिव्यजीवन जगणाऱ्यांना भेडसावू शकत नव्हता. तो मृत्यू सामान्यांना येणारा असतो. अशा मृत्यूला साधा माणूस अनिच्छेने पत्करतो. याच्या उलट दिव्यजीवन जगणारानी या सामान्य मृत्यूला जिंकून इच्छामरण पत्करलेले असते. पण इच्छामरण झाले तरी ते मरणच ! त्याचे भय असणारच व त्यावर उपाय शोधण्याची धडपड मानवी मन करणारच

या मृत्यूला सामोरी जाणारी माणसे सामान्यापेक्षा वेगळ्या तऱ्हेने विचार करू लागली. सामान्यांच्या व्यथा त्याना भेडसावीत नव्हत्या. त्यांचे जीवनच असे अधांतरी व निष्क्रिय होते की त्यांच्या मनाला व कल्पकतेला आपले एक वेगळे व विलक्षण विश्व निर्माण करण्याला भरपूर वेळ होता. असे एक विश्व निर्माण करून त्यात रमणे ही एकच क्रिया त्याना उरली होती.

आपण ज्यांना धर्मकल्पना म्हणतो त्यांचा उदय या दिव्यजीवनात गुंतलेल्या पुरोहितांनी व क्षत्रियानी केलेल्या चिंतनातून झाला. धर्मकल्पना किंवा दैवतसृष्टी निसर्गातील शक्तींविषयीच्या कुतूहलातून उत्पन्न झाली असे एक प्रमेय मानले गेले आहे. वैदिक देवता म्हणजे पर्जन्य, उषःकाल, पृथ्वी व अंतरिक्ष यांच्यावर रचलेली रूपके आहेत असे मानले जाते. हे सारे प्रमेय म्हणजे मानवी मनाच्या जिज्ञासा, कुतूहल, भय, इत्यादि प्रत्यंगांचा आधार घेऊन रचलेली एक उपपत्ती आहे. पण तिचा कच्चेपणा यात आहे की कुतूहल किंवा भय या मानवी मनोविकारातून धर्मकल्पनांचा प्राचीन व्यूह कसा उत्पन्न झाला, तो व्यूह मानवसमाजाने कसा स्वीकारला, त्या व्यूहावर आधारलेली 'राजा' ही संस्था कशी स्थिर झाली, या सर्व घटनांची नीट संगती लागत नाही. धरणीकंपाचे भय वाटले असेल पण त्या भयाचे रूपांतर दैवतकल्पनेत कसे झाले ? अशा तऱ्हेच्या आक्षेपापुढे वरील उपपत्ती टिकत नाही व म्हणून प्रथम सुचविलेली, 'राजाच्या' दिव्यजीवनातून धर्मकल्पनांचा उदय झाल्याची, उपपत्ती जास्त स्वीकार्य वाटू लागते. आज कित्येक मानवशास्त्रज्ञांनी ही उपपत्ती वेगवेगळ्या संदर्भात पुढे मांडलेली आहे. ती ग्राह्य धरून एकदोनच नवीन गोष्टी मी येथे सूचित करणार आहे.

## प्रवृत्तिमार्ग व संन्यासमार्ग

राजाचे व त्याच्या अनुचरांचे दिव्यजीवन हे एकीकडे अत्यंत भोगसमृद्ध होते व दुसरीकडे अगदी अधांतरी, एकलकोंडे व निर्णीत अशा मृत्यूच्या भयाने ग्रासलेले होते. दिव्यजीवनाच्या भोग व भय या दोन प्रमुख धारणा होत्या; त्या एकमेकात गुंतलेल्या परस्पर-आश्रयाने राहणाऱ्या व परस्परांना छेद देणाऱ्या होत्या. मृत्यूला पत्करले म्हणूनच भोग प्राप्त झालेले आणि भोगांना या मृत्यूच्या छायेने रितेपण आलेले, या जीवनात क्षणोक्षणी जाणवत असले पाहिजे. हे जीवन जगणारी माणसे अ-लौकिकपणे जगत असली तरी मुळात तुमच्याआमच्यासारखी माणसेच होती.








आणि कोणत्याही माणसाचे मन जर अशा भोग –भयाच्या कैचीत सापडले तर ते व्यथित व विकृत झाल्याशिवाय कसे राहील ? अशा मनाला भोग व भय यांची आंदोलने बसत असताना त्यात भव्य भ्रम, विलक्षण ईप्सा, व अलौकिक ( म्हणजे सामान्यांना न सुचणारे ) विचार उदय पावणारच.

बळीराजांची मने व त्याना वेढून राहणारांची मने अशा व्यथांनी, भ्रमांनी, व ईप्सांनी भारलेली होती. म्हणूनच प्राचीनतम काळात उदयाला आलेली धर्म-कल्पनांची सृष्टी ही उदात्त आणि बीभत्स, भोगलोलुप आणि आत्यंतिक विरागी, अशा द्वंद्वानी परिपूर्ण दिसते. राजाचे सेवेकरी, विशेषतः स्त्रिया, या राजाबद्दलच्या अनन्यभक्तीने भारलेल्या होत्या. राजाच्या मनोरंजना-साठी त्यांनी निर्माण केलेले नृत्य, गान, शिल्प, चित्र, नाट्य इत्यादि सर्व ललित सर्जन हे भक्तिभावानेच ओथंबलेले होते. त्यात शृंगार व प्रणय होता तो गोपींच्या कृष्णप्रेमाप्रमाणे भक्तिशृंगार होता. या साऱ्या भावविश्वात दोन भिन्न मार्ग किंवा पंथ हळूहळू आकार घेताना दिसतात : एक प्रवृत्ति किंवा भोग मार्ग व दुसरा निवृत्ति किंवा संन्यास मार्ग. प्राप्त भोग भोगा-वयाचे पण ते सर्व भोगताना पुढचे इच्छामरण सतत मनात बागवून एक अलिप्तता राखावयाची–भोगजीव-नही कर्तव्य म्हणून भोगावयाचे हा एक मार्ग. सामा-न्यांचे भोगजीवन हे केलेल्या श्रमाचे फळ म्हणून माणसाने भोगावयाचे असते. राजाने भोगावयाचे भोग श्रमाचे फळ नसतातच व ते भोगही 'क्षणभंगुर' वाटण्यासारखे मृत्यूच्या सन्मुखतेने निष्प्राण झालेले असतात. आता, ह्या प्रवृत्तिमार्गाने जगण्याऐवजी दुसरा व उलटा मार्ग म्हणजे निवृत्तीचा. स्वतः राजाला हा मार्ग अवलंबिणे अशक्यच होते. कारण राजा म्हणून भोग भोगणे त्याला प्राप्त होते. पण त्याच्या परि-सरात अशी माणसे होती की ज्यांना संन्यस्त वृत्तीने जगणे शक्य होते. राजाबरोबरच त्यांचे जीवन निगडित होते खरे, पण या राजपरिवारातील काहीजणांना भोगांचा उबग येऊन विरक्ती येणे साहजिक होते. दिव्यजीवन जग-णाऱ्या या साऱ्याच माणसांना आपण सामान्यांहून वेगळे व सामर्थ्यशाली आहोत हे भासत होते. या साम-र्थ्याची किंवा शक्तीची साधना करणे काहीजणांनी आपले इतिकर्तव्य मानले. मग या साधनेची अंगे-उपांगे विकसित होत गेली. अलौकिक जीवनातून एका पूर्ण शक्तिशाली जीवनाची ओढ असणाऱ्या या साधकांनी तप, मंत्र, देहदंडाचे व नियमनाचे काही उपाय, इत्यादि गोष्टी शोधून काढल्या. या सर्व साधनेचे उद्दिष्ट शक्ती संपादणे हेच होते. भोगांच्या बाबतीत प्रवृत्तिमार्गाची जशी वाढ होत गेली, भक्तीच्या बाबतीत जशी अनेक-विध भक्तिसाधना वाढत गेल्या, त्याप्रमाणे निवृत्ति-मार्गामध्ये ध्यान-धारणेपासून तो वज्रोलीसारख्या प्रक्रिया-पर्यंत जास्तजास्त जटिल उपायांची वाढ होत गेली.

ही सारी गोष्ट घडली असावी हे एक प्रमेय आहे. त्याला पुरावा म्हणून काही मांडावयाचे तर भारतीय उपासना पंथ, भिन्नभिन्न साधना व संप्रदाय या सर्वांमध्ये या प्राचीनतम राजमानसव्यथेची अवशिष्ट रूपे पाहिली पाहिजेत. तशी ती दिसू शकतात, इतकेच नव्हे तर या आद्य स्रोताचा मागोवा घेतला ( किंवा पार्श्वभूमी स्वीकारली ) तर आपल्या धर्मकल्पनांचा व दर्शनांचा एक सुश्लिष्ट व्यूह पाहता येतो. अमुक एक पंथ अवैदिक आहे की वैदिक आहे, तमुक आचार हे भारतात चीन-तिबेटमधून आले की मुळात येथलेच आहेत, अशा प्रश्नांना मग आजचे महत्त्व रहात नाही. कारण प्राचीन मानवसमाजाने अंगिकारलेल्या काही बीजतत्त्वातूनच सर्व देशातील धर्मकल्पनांचा व उपासनांचा उदय झालेला आहे ही गोष्ट आपल्या शोधाला मार्गदर्शक ठरते. राजा, म्हणजेच यज्ञपुरुष, आणि त्याचा परिवार यांच्या दिव्यजीवनाच्या विकसित रूपाने मानवी संस्कृ-तीचा जगव्यापी प्रपंच थाटला गेला आहे, असे जर मानले तर अनेक समस्यांची उकल होऊ शकेल.

हे खरे की बळीराजाच्या मानसातून संस्कृतीचा प्रपंच वाढत गेला हे म्हणत असतानाच हे मन व्यथित होते असे मी म्हटले आहे. तसे शीर्षकच मी लेखाला दिले आहे. यात त्या बळिराजाचा अवमान होतो किंवा नंतरच्या संस्कृति-प्रपंचाचा अधिक्षेप होतो, असे मला वाटत नाही. सर्जनशील मन हे व्यथित असू शकते, नव्हे सर्जनक्रिया ही दुःखपूर्ण आहे हे निसर्ग-क्रमातच दिसते. बळीराजाची व्यथा ही त्याच्या महान् त्यागाच्या क्रियेतून पुढे क्रमाने त्याला प्राप्त झालेली आहे. आजही काही सर्जनशील व्यक्तींच्या

बाबतीत असा अनुभव येतो की त्यांची मने व्यथित असतात व शेवटी आत्मसमर्पणाला त्या व्यक्ती प्रवृत्त होतात. परंतु आत्मसमर्पण करणारी ही माणसे व्यथितमनस्क असूनही मानवजातीला आपल्या प्रतिभेचे अमोल आविष्कार देऊन जातात. संस्कृतीची वाटचाल ही मोठी सुखाची व सुरळीत झालेली नाही हे इतर मानवी व्यवहारांवरून दिसतेच. धर्म, तत्त्वज्ञान इत्यादि बाबतीत तोच न्याय लागू होतो. व्यथा, विकृति, भ्रम, विसंगति यांच्या असह्य भारांतूनच शेवटी मांगल्याचे दर्शन मानवाला घडावे असा शाप मानवजातीला आहे असे वाटावे अशी ही परिस्थिती आहे. पण ती डोळसपणे पाहिली तर मग यात काही आश्चर्य किंवा खंत वाटायला नको की मानवाची धर्मसाधना ही बळीराजाच्या व्यथित मानसातून निर्माण झाली. एका सुवर्ण युगात कोणा एका ऋषीला धर्मतत्त्वाचे स्फुरण झाले, ही कथा इतकी सोज्वळ व साधी आहे की ती खरी मानणे भाबडेपणाचे ठरेल. धर्मतत्त्वांचे व इतरही संस्कृतीच्या उपांगाचे ज्ञान माणसाला झाले ते कष्टमय आणि व्यथित जीवनातून झाले हे मानणेच जास्त योग्य आहे व आपल्या पूर्वजांना योग्य आदर दाखविणारे आहे.*

---

*टीप :- पुरुषमेधाला आद्य मेध का मानावा लागतो याचे विवेचन Raglan यांच्या 'Hero in Myth and History' या ग्रंथात आहे. तसेच 'राजा व त्याचा परिवार' याबद्दलची तपशीलवार माहिती Hocart च्या 'King and his Consellers' या ग्रंथात आहे. 'Primitive Society and Yajna' हा माझा लेख भांडारकर इन्स्टिटयूटच्या आनाल्स व्हा. XXXI सन १९५१ मध्ये प्रसिद्ध झाला, तोही या संदर्भात पहावा. तसेच नवभारत फेब्रु. १९५५ च्या अंकात 'यज्ञव्यवस्थेचे प्राचीन स्वरूप' हा माझा लेख पहावा.










देशाचें संरक्षण करण्यासाठीं आपापल्या स्थानीं दृढपणें उभे राहून रखवाली करणाऱ्या आपल्या देशबांधवांच्या आणि तसेंच सुरक्षित व जलद





वाहतूक करून राष्ट्राच्या जीवनवाहिन्या गतिमान राखणाऱ्यांच्या सन्मानार्थ आपण दीपोत्सव साजरा करूंया.




**मध्य व पश्चिम रेल्वे**



अनुक्रमणिका

श्री. सेतु माधवराव पगडी

# पुरंदरची मोहीम : राजा जयसिंग यांची पत्रे (पूर्वार्ध)

शायिस्ताखान हा शिवाजी महाराजांच्या हातून फजित पावून निघून गेल्यानंतर, औरंगजेबाने त्याच्या जागी मिर्जा राजा जयसिंग याची नेमणूक केली. बादशहाचा निरोप घेऊन जयसिंग हा दक्षिणेकडे येण्यास निघाला. नऊ जानेवारी १६६५ रोजी त्याने नर्मदा नदी ओलांडली. दहा फेब्रुवारीला तो औरंगाबाद येथे पोहोचला, औरंगाबादेचा सुभेदार शहाजादा मुअज्जम याची भेट घेऊन तेरा फेब्रुवारीस त्याने औरंगाबाद सोडले. तीन मार्च रोजी तो पुण्यास आला.

जयसिंग हा अनुभवी आणि कुशल असा सेनापती होता. शिवाजी महाराजांविरुद्ध लढण्यासाठी त्याने अत्यंत काळजीपूर्वक अशी आपली तयारी केली. बुऱ्हाणपुराला पोहोचल्यापासूनच त्याने शिवाजी महाराजांविरुद्ध निरनिराळ्या राजेरजवाड्यांशी संधाने बांधण्यास सुरवात केली. जावळीचे मोरे, जव्हारचे राजे, इत्यादींना त्याने आपल्या पक्षात आणले. पोर्तुगीजांकडे वकील पाठवून त्यांनी शिवाजीला मदत करता कामा नये, अशा अर्थाच्या त्याने पोर्तुगीजांना सूचना दिल्या. विजापूरचा आदिलशहा आणि शिवाजीमहाराज यांचे मोगलाविरुद्ध अंतस्थ सूत आहे याची त्याला खात्री होती. त्या दोघांवर सारखी नजर रहावी म्हणून त्याने सासवड येथे आपला तळ दिला. त्याने घाटाखाली उतरून कोकणची मोहीम हाती घ्यावी अशी औरंगजेबाने त्याला सूचना केली. पण ती त्याने नाकारली.

त्यावेळी शिवाजी महाराजांच्या ताब्यात पुणे जिल्ह्याचा अर्धाभाग, कल्याण–भिवंडी हा कुलाबा जिल्ह्याचा बऱ्हंश भाग, रत्नागिरी जिल्हा, साताऱ्यापैकी प्रतापगड, आणि कोल्हापूर जिल्ह्यापैकी विशाळगड मलकापूर, इतका प्रदेश होता. पन्हाळगड हा त्यांना सोडून द्यावा लागला होता. सातारा, परळी इत्यादि किल्ले अद्यापि त्यांच्या ताब्यात आले नव्हते. जयसिंगाने या लहानशा राज्याला, चहूकडून घेरून त्याची जवळजवळ नाकेबंदी केली. लोहगड, पुणे, लोणी, शिरवळ, शिवापूर, इत्यादि ठिकाणी त्याने मजबूत ठाणी कायम केली. कुतुबुद्दीनखान, इहतिशामखान, सुजानसिंग बुंदेला, राजा रायसिंग राठोड इत्यादींच्याबरोबर तीन तीन हजाराच्या तुकड्या देण्यात आल्या. मराठे मोगल इलाख्यात घुसू पाहतील त्याला आळा घालावा. मोगल तुकड्यांनी राजगड, रोहिडा, कोंडाणा, लोहगड या भोवतालचा प्रदेश उध्वस्त करावा आणि मराठे एके ठिकाणी जमतील तर असा जमाव होऊ देऊ नये, अशी सर्व प्रकारची व्यवस्था जयसिंगाने केली.

## पुरंदरला वेढा व तह

इकडे दिलेरखानाने पुरंदरला वेढा घातला. वेढा दिवसेदिवस कडक होत चालला. मोगलांची सैन्ये राजगड, कोंडाणा, लोहगड इत्यादि किल्ल्यापर्यंत पोहोचून भोवतालचा प्रांत बेचिराख करू लागली. विजापूरकरांना जयसिंगांने धाकदपटशा आणि प्रलोभने, आश्वासने इत्यादींच्या द्वारे शिवाजी महाराजांपासून वेगळे केले होते. दोन जून १६६५ ला मोगलांनी पुरंदरच्या लगतच्या किल्ल्याचे पांच बुरूज हस्तगत केले.

शिवाजी महाराजांनी या सर्व गोष्टींचा विचार केला. जयसिंगाची तयारी, त्याचा तडफदारपणा आणि आपली स्वतःची मर्यादित साधने, ही सर्व लक्षात घेऊन शिवाजी महाराजांनी ११ जून १६६५ रोजी पुरंदर जवळ जयसिंगाची भेट घेतली आणि पुरंदरचा तह घडवून आणला.

या मोहिमेसंबंधी जयसिंगाने औरंगजेबाला वेळोवेळी जी पत्रे लिहिली ती त्याचा चिटणीस उदयराज ऊर्फ तालेयारखान याने हफ्त अंजुमन या नावाने तयार केलेल्या फारसी पत्रसंग्रहात आढळतात हफ्त अंजुमनच्या तीन प्रती उपलब्ध आहेत. एक प्रत प्यारिसच्या राष्ट्रीय ग्रंथालयात आहे. दुसरी प्रत बनारस येथे एक कायस्थ कुटुंबापाशी आढळली. तिसरी प्रत जयपूर येथे उपलब्ध झाली.

प्यारीसची प्रत अपूर्ण आहे. या प्रतीत जूनच्या पहिल्या आठवड्यापर्यंत (इ. स. १६६५) जयसिंगाने



अनुक्रमणिका








औरंगजेबाला पाठविलेली अकरा पत्रे आढळतात तोपर्यंत शिवाजी महाराज आणि जयसिंग यांची गाठ पडली नव्हती. बनारस आणि जयपूर येथील प्रतीत या पुढील पत्रे असून त्यात पुरंदरचा वेढा, शिवाजी जयसिंग भेट, शिवाजी महाराजांची औरंगजेबाला अर्जी, पुरंदरचा तह, विजापुरावर जयसिंगाची मोहीम इत्यादींचा तपशील आला आहे. यापैकी कित्येक पत्रांचा इंग्रजी अनुवाद जदुनाथ सरकार यानी केला असून तो त्यांच्या हाऊस ऑफ शिवाजी या ग्रंथात आढळतो. याशिवाय सदरील बनारस प्रतीतील पत्रांचे इंग्रजी भाषांतर श्री. जे. एन्. सरकार हे करीत असून ते बेंगाल पास्ट अँड प्रेझंट ( जानेवारी जून, जुलै, डिसेंबर १९६२ ) या नियतकालिकात प्रसिद्ध झाले आहे. भाषांतर अद्यापि पूर्ण झाले नाही.

पण जदुनाथ सरकार यानी प्यारिस प्रतीतील काही पत्रांचेच अनुवाद केलेले मला आढळून आले. या प्रतीची एक फोटोप्रत माझे मित्र डॉक्टर पी. एम्. जोशी, संचालक, सरकारी दप्तरखाना, मुंबई, यांच्या प्रयत्नाने मला उपलब्ध झाली. या प्रतीतील अकरा पत्रांचा मूळ फारसीवरून केलेला मराठी अनुवाद पुढे दिला असून त्यावरून जयसिंगाची युद्धकुशलता, त्याचा धोरणी स्वभाव आणि तडफदारपणा या गुणांची कल्पना येईल.

## मिर्झा राजा जयसिंग याची औरंगजेबास पत्रे

### ( १ )

रजब महिन्याच्या पहिल्या तारखेस ( आठ जानेवारी १६६५ ) आपले पत्र मिळाले, रजबच्या दुसऱ्या तारखेस ( नऊ जानेवारी १६६५ ) मी नर्मदा पार झालो. मी पुढे जात आहे. मी कोठेही विनाकारण वेळ दवडणार नाही. मी शहाजाद्याची ( औरंगाबादेचा सुभेदार शहाजादा मुअज्जम ) गाठ घेईन तेथे तीन दिवसाच्यावर राहणार नाही. आपल्या आज्ञेप्रमाणे मी पुण्याला पोहोचेन. तेथे जे काही घडेल ते मी आपल्याला कळवीन.

### ( २ )

विनंति की रजब महिन्याच्या बारा तारखेस ( एकोणीस जानेवारी १६६५ ) शुक्रवारी मी बुऱ्हाणपुरास पोहोचलो. शहाजाद्यापाशी ( औरंगाबादेत ) तीन दिवसांच्यावर राहावयाचे नाही असे ठरले असल्यामुळे सैन्याची आणि सरंजामाची सगळी पाहणी करण्यासाठी मला बुऱ्हाणपुरात अधिक दिवस मुक्काम करावा लागणार आहे. रजबच्या चोवीस तारखेस मंगळवारी ( एकतीस जानेवारी ) येथून कूच करून पुढील मार्ग आक्रमिण्याचे मी ठरविले आहे. शाबान महिन्याच्या चार तारखेस शुक्रवारी ( दहा फेब्रुवारी १६६५ ) मी शहाजाद्याची गाठ घेऊन शाबानच्या सात तारखेस सोमवारी ( तेरा फेब्रुवारी १६६५ ) तेथून पुढे रवाना होईन.

### ( ३ )

जावळीचे जमीनदार चंद्रराय याजसंबंधी मी लवकरच आपल्याला लिहिणार आहे. मी त्याला बोलावू पाठविले होते. याच सुमारास चंद्रराय आणि त्याचे भाऊ याजकडून मुधा नावाचा ब्राह्मण माझ्या एका सेवकाबरोबर आला. चंद्रराय वगैरेना सुरक्षिततेची हमी आणि खर्चासाठी रक्कम मिळेल अशी त्याची अपेक्षा होती. मी त्याला कौल दिला. खर्चासाठी रक्कम दिली. आणि चंद्रराय आणि त्याचे भाऊ यांना लवकर घेऊन येण्यासाठी रवाना केले आहे.

माझे इतर इसम मी रवाना केले होते. पुरंदरच्या पायथ्याशी शिवाजीचे नोकर अलमाजी व खडकोली ( जदुनाथांचे मते आत्माजी आणि कहर कोळी ) आणि त्यांचे दोन भाऊ हे होते. त्यांच्या पदरी तीन हजार माणसे असून तोफांचे रक्षण करण्याचे काम त्यांच्याकडे होते. त्यांच्या एका वकिलाला माझे इसम घेऊन आले. त्याची इच्छा बादशाही चाकरी पत्करावी अशी आहे. त्याना समाधानाची आणि खातरजमेची पत्रे गेली आहेत. ते लोक आल्यावर त्यांची कामगिरी पाहून त्याना काय मन्सबी द्याव्या यासंबंधी लिहीन.

मी बुऱ्हाणपूर येथे असताना जव्हारच्या जमीनदाराकडून एक इसम आला होता. बादशाही चाकरीत दाखल होण्याची जमीनदाराने इच्छा दर्शविली आहे. मी त्याला ( वकीलाला ) सांगितले की राजाने माझ्याकडे यावे किंवा आपला मुलगा किंवा भाऊ यास पाठवावे. त्याने बादशाही चाकरीत भरीव अशी कामगिरी करून दाखवावी म्हणजे त्याच्यावर बादशहाची कल्पनातीत कृपा होईल हे त्यालाच दिसून येईल.

बादशहानी त्याच्या नावाने फर्मान दिले आहे ते माझ्याजवळ आहे. योग्य वेळी मी ते त्याला देईन. या मोहिमेत त्याचा बराच उपयोग होईल. त्याला काय मानमरातब द्यावा यासंबंधी मी नंतर लिहीन. दुसरी गोष्ट म्हणजे मी फरसमील (फ्रयांसिस्को) आणि दीगमील (दियोगो दि मेलो) या दोन फिरंग्याना समुद्रकाठच्या बंदरावर पाठविले आहे. शिवाजीचे आरमार असून त्यांचा समुद्रातून संचार चालू आहे. त्याला हवे असेल त्या ठिकाणी तो आपली जहाजे पाठवितो. मी फिरंग्यांच्या बरोबर फिरंगी अधिकाऱ्यांना लिहून पाठविले आहे की तुम्ही मोगल अधिकाऱ्यांशी सहकार्य करावे, बादशहाच्या आज्ञेप्रमाणे वागावे आणि शिवाजीशी काही संबंध ठेवू नये.

ज्या कामावर माझी नेमणूक झाली त्याचाच मी रात्रंदिवस विचार करीत असतो. परमेश्वर कृपेने आणि आपल्या भाग्याने हे कार्य यशस्वी करीन. प्रत्येक बाबतीत आपल्या मार्गदर्शनाची अपेक्षा बाळगून आहे.

मी बुऱ्हाणपुराला पोहोचण्याच्या दोन दिवस आधी दाऊदखान तेथे पोहोचला होता. बुऱ्हाणपुरच्या सुभ्याची व्यवस्था त्याच्याकडे आहे. याशिवाय आपल्या आज्ञेस अनुसरून आपले सुसज्ज सैन्य घेऊन या मोहिमेत माझ्याशी सहकार्य करण्याची जबाबदारी त्याच्यावर आहे. त्याने विनंति केली आहे ती ही– माझा मुलगा पाटणा येथे आहे. त्याच्याबरोबर कसलेले आणि उमदे शिपाई आणि अधिकारी आहेत. तर माझ्या मुलाला पाटण्याहून इकडे लवकर निघून येण्याविषयी आज्ञा व्हावी. सुजानसिंगासंबंधी पण मी अशीच विनंति करीन. म्हणजे मी लवकर कामाच्या ठिकाणी जाऊन पोहोचेन. वाजवी होते ते लिहिले आहे.

(४)

विनंति की शाबान महिन्याच्या चार तारखेस (दहा फेब्रुवारी १६६५) शुक्रवारी मी शहाजादा (मुअज्जम) याची गाठ घेतली. ते माझ्याशी अतिशय मेहरबानीने वागले.

शाबानच्या पाच तारखेस (अकरा फेब्रुवारी १६६५) संध्याकाळी मी त्यांची एकांतात गाठ घेतली. मी त्यांना सांगितले ते हे– अशा बादशहाच्या (औरंगजेब) कृपाछत्राखाली आपण नांदत आहोत यापेक्षा अधिक भाग्याची अशी कोणती गोष्ट असू शकेल ? आपले बादशहा हे परमेश्वरभक्त, धर्मनिष्ठ, न्यायी आणि राज्यकारभार कुशल आहेत. जगातील सत्ताधिपांनी त्यांच्यापासून धडा घ्यावा. आपण कोणीही त्यांच्या मर्जीविरुद्ध काही करू नये. हे ऐकून शहाजादा म्हणाले, "तुम्ही म्हणता तसेच आहे. आम्ही आमच्या निष्ठेपासून ढळणार नाही."

यानंतर सफशिकनखान यासंबंधी मी शहाजाद्यांना सांगितले की हा मनुष्य कामाचा आहे. त्याच्यावर आपली मेहरबानी असावी. ते त्यांनी कबूल केले. सफशिकनखान हा आज्ञाधारक, एकनिष्ठ आणि प्रामाणिक असून माझ्या विश्वासातील आहे.

आपल्या आज्ञेप्रमाणे मी शहाजाद्यापाशी तीन दिवसांच्यावर थांबलो नाही. शाबान महिन्याच्या सात तारखेस (तेरा फेब्रुवारी १६६५) मी शहाजाद्याचा निरोप घेतला आणि आपल्या उद्दिष्ट स्थळाकडे रवाना झालो. येथे काय काय करण्यास हवे ते मी आपल्याला कळवीन आणि आपली जशी आज्ञा होईल त्याप्रमाणे वागेन.

(५)

विनंति. शाबान महिन्याच्या एकोणतीस तारखेस (सात मार्च १६६५), महाराजा जसवंतसिंग हे येथून (पुण्याहून) आपल्या हुजुरात येण्यास निघाले.

या मोहिमेतील सर्वात पहिले आणि आवश्यक काम म्हणजे आपली ठाणी मजबूत करणे हे होय. तेच काम मी प्रथम हाती घेतले. जुन्नरपासून तळ कोकणच्या घाटापर्यंतच्या (लोहगड किल्ल्याच्या समोर असलेला) प्रदेशावर मी कुतुबुद्दीनखान याची नेमणूक केली आहे. त्याने मागितले तितके सैन्य मी त्याला दिले. मी त्याला ताकीद केली आहे की लोहगडाच्या समोर एखादी योग्य जागा पाहून तेथे मजबूत ठाणे कायम करावे. आणि तेथे तीन हजार स्वारशिपाई ठेवावे. ताडदुर्ग किल्ल्याच्या समोरही असेच ठाणे कायम करून तथही मुबलक सैन्य ठेवण्यात येईल. शिवाजीचे येणेजाणे जेथून आहे त्या प्रत्येक भागात ठाणी कायम करण्यात येतील. शिवाजीचे येणेजाणेच त्या भागातून बंद करण्यात येईल. स्वतः कुतुबुद्दीनखान याने सारखे फिरत राहून ठाण्यावर लक्ष








ठेवावे आणि शिवाजीला आक्रमण करण्याची कोणतीही संधि देऊ नये असे मी त्याला बजाविले आहे.

बादशाही मन्सबदार ( अधिकारी ) या इलाख्यात प्रजेचे रक्षण करण्याच्या कामावर होते. आमची ठाणी कायम झाल्यावर या अधिकाऱ्यांचे ( मुल्की ) तेथे राहाणे अनावश्यक आहे. त्याना आपल्याकडे बोलावून घ्यावे असे मी कुतुबुद्दीनखान यास सांगितले आहे.

त्या भागातील देशमुख-देशपांड्यांच्या कडून मुचलके घेण्यात यावेत. आपल्या बादशाही इलाख्यातील कोणीही, मग तो जमिनदार असो की रयत असो, शिवाजीबरोबर अंतस्थ असा संबंध राखता कामा नये. असे कोणी करील तर त्याला शिक्षा करण्यात येईल. यासाठी देशमुख-देशपांड्यांच्याकडून मुचलके घेण्यात आले आहेत. कुतुबुद्दीन खानापाशी स्वतः आणि ठाण्याठाण्यातून मुबलक सैन्य आहे. मी त्याला वरील प्रकारच्या सूचना दिल्या आहेत. तू आपले काम चांगले पार पाडलेस तर बादशहाची तुझ्यावर कृपा होईल असे आश्वासन देऊन मी त्याला पाठविला आहे.

आपल्या आज्ञेप्रमाणे इहतिशामखान यास चार हजाराचे सैन्य देऊन मी पुण्याच्या ठाण्यावर नेमले आहे. लोहगड आणि पुणे यातील अंतर चवदा पंधरा कोसाचे आहे. लोहगडच्या प्रमाणे या दोन्ही स्थळांच्या मध्ये डोंगराचे घाट आहेत. तेथेही दोन हजार सैनिकांचे ठाणे कायम करणे आवश्यक होते. तेही कायम करण्यात आले आहे.

विनंति की प्रथम तळकोकणात उतरून छावणी करावी असा माझा बेत होता. पण इकडे आल्यानंतर मला दिसून आले की या अवधीत विजापूरचा आदिलखान आणि दुष्ट शिवाजी यांचा एकोपा झाला आहे. त्यामुळे तळकोकणच्या वाटेने जाणे मला योग्य वाटले नाही. मी दूर अंतरावरून ( तळकोकणातून ) चाल करून जात आहे आणि विजापूरच्या इलाख्यापासून लांब आहे हे पाहून शिवाजी आणि आदिलखान हे एक होतील आणि त्यांच्यावर कोणतेच बंधन राहाणार नाही. त्याना आमच्याबद्दल धाक वाटणार नाही. या कारणाने मी सासवड येथे आपली छावणी कायम केली आहे. सासवड हे शिवाजीचे पुरंदर आणि इतर इलाखे याना लागून आहे. विजापूरच्या प्रदेशालाही ते जवळ पडते. रमजान महिन्याच्या सात तारखेस ( चवदा मार्च १६६५ ) मी सासवडच्या दिशेने निघालो.

आदिलखानाने ( विजापूरचा ) मुल्ला खुर्रम नावाचा इसम वकील म्हणून पाठविला आहे. तो येथे येऊन आमचे सैन्य आणि छावणी पाहील. आणि मग माझा जो काही निरोप असेल तो आदिलखानाला कळवील.

बादशहा सलामत, या भागात आल्यावर मला दिसून आले की आपल्याला पायदळ सैन्याची अतिशय आवश्यकता आहे. दहा हजार पायदळ सैन्य आपल्या खास दिमतीतून वापरण्यासंबंधी आपण आज्ञा केली आहे. त्यापैकी पाच हजार तळ कोकणात तैनात होतील. बाकीचे इतर ठाण्यावर नेमले गेले आहेत. याशिवाय मी सात हजार पायदळ शिपायांचे सैन्य उभे करीत आहे. ठिकठिकाणाहून मी हे सैन्य बोलावून घेत आहे. माझे अधिकारी सैन्यभरतीसाठी फिरतील. सैनिकाना ते माझ्याकडे घेऊन येतील. त्यात कोणी अडथळा करू नये अशी आपण आज्ञा करावी. कोराखातमपूर भागात उत्कृष्ट शिपाई मिळतात. तेथून मी दोन हजार शिपाई बोलाविले होते. पण त्या परगण्याचा चौधरी पूरणमल यास तेथील फौजदार याने कैद केले. त्याने तिकडून सैनिकांना येऊ दिले नाही. पण ते दोन हजार सैनिक इकडे येण्यात दोन फायदे आहेत. एकतर ते बादशाही चाकरीत राहातील आणि दुसरे म्हणजे ते आपल्या प्रांतापासून दूर राहातील. फौजदारानी त्यांच्या येण्याला अडथळा का करावा हे कळत नाही. हे दोन हजार बंदुकची आणि धनुर्धारी ( तीरंदाज ) तिकडून इकडे येण्यात कोणताच अडथळा निर्माण होऊ नये म्हणून आपण फौजदाराला आज्ञा करावी.

दुसरी गोष्ट, अहमदनगर आणि परिण्डा हे किल्ले माझ्या छावणीपासून जवळ आहेत. आमचे युद्धकैदी त्या किल्ल्यातून ठेवण्यात यावेत असे मी तेथील किल्लेदाराना लिहिले. याशिवाय मी इतर काही बाबीविषयी त्याना लिहिले. त्याना या बाबतीत आपली आज्ञा हवी आहे. वस्तुस्थिति अशी आहे की पावसाळ्यानंतर मी माझ्या छावणीत बसून राहणार नाही. येथे भक्कम ठाणे कायम करीन आणि जेथे जेथे म्हणून गेल्याने ही मोहीम यशस्वी होण्याची शक्यता आहे तेथे मी तडक

कूच करून जाईन. आपण परिण्डा आणि अहमदनगर येथील किल्लेदारांना आज्ञा करावी की मी युद्धकैदी किंवा सैन्याचा सरंजाम आणि इतर सामुग्री पाठविली तर त्यानी त्यांची व्यवस्थितपणे देखरेख करावी. याशिवाय मी त्याना लिहीन त्याप्रमाणे अमलबजावणी करण्याविषयीही त्याना आपण कळवावे.

बादशहा सलामत– कर्णाटकच्या जमीनदाराकडे कुणाला तरी पाठवावे असे मी ठरविल्याचे आपल्याला कळविले होते. येथे आल्यावर आदिलखान (विजापूर) आणि शिवाजी यांचा एकोपा झाल्याचे मला आढळून आले. त्यामुळे कर्णाटकच्या जमीनदारांना बादशाही कृपेचे उमेदवार करून त्याना विजापूरकरांपासून फोडावे असे मी ठरविले. म्हणजे ते तिकडून फुटून मला येऊन मिळतील. म्हणून मी काही माणसे त्यांच्याकडे पाठविली आहेत. ते बादशाही चाकरीत प्रविष्ट होतील अशी मला आशा आहे. यावर जे घडेल ते मी आपल्याला कळवीन.

या मोहिमेतील मोगल अधिकारी आणि इतर सेवक यांची आर्थिक स्थिति असमाधानकारक आहे. ते मदतीची याचना करीत आहेत. त्यापैकी प्रत्येक गरजूला आर्थिक मदत ही दिली पाहिजे. अगदीच मदत केली नाही तर ही माणसे कामातून जातील. म्हणून मी सरकारी खजिन्यातून एक लाख रुपये काढून घेऊन माझ्या जवळ ठेविले आहेत. माझ्यापाशी कोणी येऊन मदत मागितली तर कर्ज म्हणून मी त्याला मदत करीन. कुणाकुणाला मी रकमा दिल्या ते मी आपल्याला कळवीनच. ही मदत मी आपल्यासाठी घेतली नाही म्हणून ही सरकारातून दिली गेली असे समजून तशी आज्ञा व्हावी. वाजवी समजून ही विनंति केली आहे.

बादशहा सलामत– सेनेचे नेतृत्व करावयाचे म्हणजे शिपायांना, आपल्याला प्रोत्साहन मिळेल आणि प्रसंगविशेषी शिक्षाही होऊ शकेल अशी भावना राहिली पाहिजे. शिपाई सैनिक काय आणि इतर संबंधित माणसे काय त्यांचे आपण हित अहित करण्याचा आपल्याला अधिकार असला पाहिजे.

अमीरुलउमरा (शायस्ताखान) हे येथील सुभेदारीवरून हटले. (आता शहाजादे आले आहेत) येथील परिस्थिति पुढीलप्रमाणे आहे:– सैन्यातील सैनिक आणि अधिकारी यांच्या बदल्या, नेमणुका, तनखा, जहागिरी, देणीघेणी, बडतर्फी, इत्यादींचा संबंध औरंगाबादेतील (शहाजादे आणि) अधिकारी यांच्या अधिकारात आहे. आपले काहीही काम काढून घेणे असेल तर लष्करातील माणसाला येथील आपली कामे टाकून औरंगाबादेस जावे लागते आणि तेथील कारभाऱ्याच्या मर्जीप्रमाणे वागावे लागते. आपल्या सैन्यातील सैनिक आणि अधिकारी यांची सेनापतीला पूर्ण माहिती असल्यामुळे कुणाशी कसे वागावे हे त्याला कळते. पण त्यांना बढती देणे, किंवा शिक्षा करणे त्याच्या हातात नाही अशी येथे स्थिति आहे. शहाजादे हे जाणकार आहेत. या मोहिमेची जबाबदारी ज्यांच्यावर राहील ते आपल्या आज्ञेप्रमाणे शहाजाद्यांपाशी रुजू होऊन विनंति करतील.

पण माझी विनंति ही की, दक्षिणच्या सुभ्यातील सरंजामदारांच्या नेमणुका, बढत्या, बडतर्फ्या किंवा इतर सेवकांच्या नेमणुका, तैनाती, देणी घेणी, यांचा संबंध औरंगाबादेच्या अधिकाऱ्यांशी आहे तो बदलून ते अधिकार माझ्याकडे देण्यात यावेत. ज्यांना तनखा, जागिरी हव्या आहेत त्यानी माझ्याकडे रुजू व्हावे अशी आज्ञा व्हावी. हा सेवक आपल्याच देखरेखीखाली तयार झाला आहे. सरकारचे नुकसान होईल अशी कोणतीही गोष्ट या सेवकाच्या हातून होणार नाही. जे जे काही घडेल ते मी दिरंगाई न करता आपल्याला कळवात जाईन, सैन्यातील अधिकारी आणि इतर सेवक याना कळले की त्यांचे बरे वाईट करण्याचा अधिकार माझ्याकडे आहे तर ते मनःपूर्वक आपली कामे करू लागतील. सरकारी कामे चांगली पार पडावी याशिवाय दुसरा कोणताच हेतु नाही. माझी विनंति आपल्या मर्जीस येत नसेल तर काही हरकत नाही. माझे म्हणणे आपल्यापर्यंत पोहोचले हेच समाधान. माझी विनंति मान्य झाली नाही असे लोकांना कळले तर माझा अधिकार राहाणार नाही. म्हणून हा अर्ज गहाळ होईल अशी आशा करतो.

बादशहा सलामत– अफजल भटारा विजापुरी (अफजलखान) याचा मुलगा फाजल हा बादशाही चाकरीत येऊ इच्छितो. त्याला जाणणारे लोक सांगतात








की त्याला पांचहजारी आणि पांचहजार स्वारांची मन्सब दिल्यास फारच उपयुक्त होईल. विजापूर दरबारात त्याला यापेक्षा कमी मिळत नाही. आपल्या बापाला ( अफजलखानाला ) मारले म्हणून तो शिवाजीचा द्वेष करतो. त्याचे मन वळविण्यासाठी मी त्याला पत्र लिहिले आहे आणि तू अर्ज करून तुला काय हवे आहे ते लिही असे त्याला कळविले आहे.

अशीच इतर माणसे येतील त्याना मी समजावून त्यांचे मन वळविणार आहे. शिवाजीचे काही सहकारी त्याला सोडून बादशाही चाकरीत येतील असा रंग दिसू लागला आहे. त्याना आणि इतरांना मन्सबी आणि जहागिरी इत्यादि देण्यासंबंधी आपली जशी आज्ञा होईल तशी अंमलबजावणी केली जाईल.

बादशहा सलामत, सय्यद मन्सूरखान हा येथे आहे. त्याचे म्हणणे असे की त्याचे घरदार आहे त्या जिल्ह्यातील अधिकारी त्याचा भाऊ आणि इतर आप्त-स्वकीय याना विनाकारण त्रास देत आहेत. त्यांच्यावर लक्ष असावे आणि त्याना कोणत्याही प्रकारे त्रास होणार नाही अशी काळजी घेण्यासंबंधी अधिकाऱ्यांना ताकीद करण्यात यावी.

( ६ )

विनंति की, मी ठिकठिकाणी ठाणी कायम केली आणि रमजान महिन्याच्या सात तारखेस ( चवदा मार्च १६६५ ) मी सासवडला रवाना झालो हे मी यापूर्वीच्या पत्रात आपल्याला कळविले आहे. या सुमारास बातमी आली की शिवाजी हा लोहगडाजवळ आला असून मी कूच करून पुढे निघताच बादशाही मुलखावर हल्ला करण्याचा त्याचा बेत आहे. हे ऐकून मला पुण्याच्या परिसरात काही मुक्काम करणे भाग पडले. कुतुबुद्दीनखान हा खजिना पोहोचविण्यासाठी म्हणून जुन्नरला गेला होता. लोहगडच्या समोर आपले ठाणे कायम होत आहे तर तू तिकडे ताबडतोब रवाना हो म्हणजे मी पुढे कूच करीन असे मी कुतुबुद्दीन खानाला लिहिले. रमजान महिन्याच्या चवदा तारखेस (एकवीस मार्च १६६५ ) तो जुन्नरहून मी सांगितलेल्या ठाण्याकडे रवाना झाला. ते ऐकून मी रमजान महिन्याच्या सोळा तारखेस ( तेवीस मार्च १६६५ ) लोहगडच्या परिसरातून पुढे निघालो. विजापूरचा वकील मुल्ला खुर्रम हा मला त्याच मुक्कामी भेटला. त्याने आदिलखानाचे काय ,म्हणणे आहे ते सांगितले. मी पण त्याला पोक्तपणाच्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या. त्याने आपल्या धन्याला लिहून कळविले असून तो उत्तराची प्रतीक्षा करीत बसला आहे. तो खरा आहे की खोटा आणि प्रतिकूल आहे हे अल्पावधीत कळून येईल. मला या बाबतीत जे काही करणे योग्य वाटेल ते मी आपल्याला लिहून कळवीन.

बादशहा सलामत, मी लोणी या मुक्कामी पोहोचलो. हे गाव पुण्यापासून सासवडच्या दिशेने पाच कोसावर आहे. पुरंदरच्या पठारावर ते वसले आहे. मराटे बादशाही मुलखावर ज्या दोन मार्गांनी आक्रमण करतात त्या मार्गावर हे गाव वसले आहे. येथे एक भक्कम ठाणे कायम करणे आवश्यक आहे. म्हणून मी रामा आणि हणमंत ( हणमंतराव निंबाळकर ) याना तीनशे स्वार, पायदळ, आणि बंदूकची देऊन येथील ठाणेदारीवर नेमले आहे. मी तेथे तीन मुक्काम केले आणि तेथील गढी दुरुस्त आणि सुरक्षित केली.

रामा आणि हणमंत याची हकीकत अशी आहे– हे मूळचे सुप्याचे राहाणारे, निजामशाही काळात हे धरंदाज आणि सुसंपन्न होते. बऱ्याच वर्षांपासून हे चांद्याच्या जमिनदाराच्या पदरी होते. आपला निरोप घेऊन येत असता मी आपल्याला चांद्याच्या जमिनदाराविषयी सांगितलेच होते. चांद्याच्या जमिनदाराला मी कळविले होते की तू किंवा तुझा मुलगा हे या मोहिमेत भाग घेऊ शकलात तर तुमची वतने तुम्हाला परत मिळतील असे मी त्या जमिनदाराला कळविले. रामा आणि हणमंत हे त्याचे अधिकारी होते. त्यानाही मी वरील अर्थाची पत्रे लिहिली. यावर ते चांद्याच्या जमिनदाराची नोकरी सोडून माझ्याकडे आले. चांद्याचा जमिनदार अगर त्याचा मुलगा हे येऊ शकले नाहीत. त्याचा विचार मी नंतर करीन. रामा आणि हणमंत ही माणसे आपल्या फार उपयोगी पडतील. लोणीचे ठाणे महत्त्वाचे आहे त्याचे रक्षण ते करतील. त्याना काय मन्सब द्यावी याबद्दल वेगळी विनंति केली आहे. त्याना या गावाची ( लोणी ) जहागीर दिल्यास बरे होईल. गावाचा वसूल पन्नास रुपये आहे. दोनशे स्वार सैनिक घेऊन ते हे ठाणे सांभाळू शकतील. त्यांचे उरलेले शंभर सैनिक इतरत्र नेमले जाऊ शकतील.



अनुक्रमणिका






बादशहा सलामत– शिरवळ येथे पूर्वी आपले ठाणे नव्हते. तेथे ठाणे कायम करणे अतिशय जरूरीचे आहे. तेथे मी सय्यद अब्दुल अजीज शुजातखानी याची नेमणूक केली आहे. पूर्वी त्याला एक हजारी आणि हजार स्वारांची मन्सब होती. आता त्याला पाचशेची आणि तीनशे स्वारांची मन्सब आहे. सय्यद अब्दुल अजीज हा अनुभवी आणि जाणकार असा शिपाईगडी आहे. मी त्याच्याबरोबर तीन हजार स्वार-सैनिक देऊन त्याला शिरवळकडे पाठविले आहे. त्याच्या मन्सबीत मी पाचशेची आणि स्वारांच्या मन्सबीत तीनशेची वाढ करून मी त्याचा उत्साह वाढविला आहे. तो आता एक हजाराचा आणि तीनशे स्वारांचा मन्सबदार बनला आहे. या बाबतीत आपली जी आज्ञा.

जावळीचे जमीनदार बाजी चंद्रराय, आणि अंबाजी गोविंदराव, आणि माणकोजी धनगर यांना मी आपल्याकडे बोलाविले होते. त्याबद्दल मी आपल्याला या पूर्वी कळविले होते. ते मला येऊन भेटले. त्याना कितीच्या मन्सबी देण्यास हव्या याचा तपशील वाकनीसाच्या यादीवरून आपल्याला कळेल. त्याना मी सय्यद अब्दुल अजीजखान याच्याबरोबर पाठविले आहे. त्या भागाची ते शक्यतितकी माहिती काढतील. परमेश्वर करील तर शिवाजीचा समूळ नाश होईल. तो काही गडबड करू म्हणेल तर त्याचा बंदोबस्त करता येईल. आपल्या ज्या काही सूचना असतील त्यांची मी वाट पाहात आहे.

शहाजाद्यानी लिहून कळविले आहे की विजापूर राज्यातील निलंगा येथील किल्लेदार मलिकमहंमद हा किल्ला आपल्या हवाली करून बादशाही नोकरीत प्रविष्ट होऊ इच्छितो. मी उत्तरात लिहिले की किल्ला महत्त्वाचा आणि भोवतालचा प्रदेश समृद्ध असल्यास तो हस्तगत करण्यास हरकत नाही. पण निलंग्याला मातीची गढी आहे आणि तो तालुकाही समृद्ध नाही. बादशहाच्या आज्ञेवाचून या प्रकरणात आपण घाई करणे योग्य होणार नाही. किल्लेदाराला आपण आशा लावून ठेवावी. आणि सगळी हकीकत बादशहांना कळवून त्यांची आज्ञा होईल तसे करावे.

बादशहा सलामत, आदिलखान ( विजापूर ) आणि शिवाजी यांचा एकोपा झाला याबद्दल मला तिळमात्र संशय नाही. पण ती जूट आता मी फोडीत आहे. आपल्या सैन्यातील काही अफगाणांना व्यापाऱ्याचे सोंग देऊन विजापूर राज्यातील काही किल्ल्यांकडे पाठविले आहे. एखादा किल्ला सर करून घेणे शक्य असल्यास तसे करून विजापूरकरांना खडबडून जागे करावे असा माझा बेत आहे.

सिद्दी जौहर याने निरोप पाठविला आहे की सोलापूरचा किल्ला माझ्या ताब्यात आहे. मला पाच हजारी आणि तीन हजार स्वारांची मन्सब मिळाली तर मी तो किल्ला मोगलांच्या हवाली करीन. पण ही दक्षिणची माणसे बोलल्याप्रमाणे वागत नाहीत. त्यांच्यावर क्वचितच विश्वास ठेवता येईल. पण मातबर माणसे पाठवून हे प्रकरण यशस्वी होईल असा रंग दिसला तर यासंबंधी आपल्या काय सूचना आहेत. ही मसलत कशी तडीस जाईल हे सांगता येत नाही म्हणून आपण आपल्या सूचना गुप्तपणे आणि त्वरित पाठवाव्या.












मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अद्वयानंद गळतगे

# जीवाची उत्पत्ति : १ :

पृथ्वीवर मानव कसा निर्माण झाला हा प्रश्न मानवाइतकाच जुना आहे. डार्विनच्या काळापर्यंत परमेश्वरच मानवाच्या निर्मितीला कारणीभूत आहे असे मानण्यात येत होते. डार्विनने अनेक पुराव्यानिशी प्रथमच असे सिद्ध केले की मानवाची उत्पत्ति उत्क्रांतीच्या प्रक्रियेने नैसर्गिकपणे झाली असून दैवी शक्तीचा त्याच्याशी कसलाच संबंध नाही. पण पृथ्वीवरील सर्वच जीवांची उत्पत्ति उत्क्रांतीच्या प्रक्रियेने झाली असेल तर पहिल्या जीवाची उत्पत्ति कशी झाली ? डार्विनने हा प्रश्न दैवी शक्तीला आवाहन करून सोडविला होता ! पण हक्स्लेसारख्या शास्त्रज्ञांचे या उत्तराने समाधान होणे शक्य नव्हते. मनुष्याच्या उत्पत्तीला परमेश्वर जबाबदार नाही हे जर खरे असेल तर पहिल्या जीवाच्या उत्पत्तीला त्याला का जबाबदार धरावे असा त्यांचा सवाल होता. मानवाच्या उत्क्रांतीविषयी पुरावे उपलब्ध होताच ज्याप्रमाणे दैवी शक्ति अनवश्यक ठरली त्याचप्रमाणे पहिल्या जीवाच्या उत्क्रांतीविषयी पुरावे उपलब्ध होताच तिची आणखी आवश्यकता उरणार नाही असा त्यांचा विश्वास होता. मात्र या विषयावर निश्चित मत मांडण्याइतकी या क्षेत्रात त्याकाळी प्रगति झाली नसल्याने हक्स्लेला केवळ अनुमानावरच समाधान मानणे भाग होते.

हल्ली जीवरसायनशास्त्रात झालेल्या प्रगतीमुळे प्राथमिक जीवाच्या उत्क्रांतीसंबंधी बरेच पुरावे उपलब्ध झाले असून जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न धार्मिक कक्षा ओलांडून शास्त्रीय कक्षेत आला आहे. १९५७ साली मॉस्को येथे जगातील प्रमुख जीवरसायनशास्त्रज्ञांची एक आंतरराष्ट्रीय परिषद जीवाच्या उत्पत्तीचा विचार करण्यासाठी भरली होती, ही गोष्ट गेल्या शंभर वर्षात या प्रश्नाच्या बाबतीत झालेल्या प्रगतीचाच पुरावा होय.

### जीवाच्या उत्पत्तीविषयीचे सिद्धांत

जीवाच्या उत्पत्तीविषयी चार दृष्टिकोन शक्य आहेत. हे चार दृष्टिकोन पुढीलप्रमाणे :

( १ ) जीवाची उत्पत्ति दैवी शक्तीच्या मध्यस्थीमुळे झाली. हा दृष्टिकोन बहुतेक सर्व धर्मग्रंथातून मांडलेला आढळून येतो. हल्ली हा दृष्टिकोन मांडणाऱ्यांची संख्या वेगाने घटत आहे.

( २ ) जीव शुद्ध भौतिक नियमानी नैसर्गिकपणे निर्माण झाला. हा दृष्टिकोन उत्क्रांतिवाद या नावाने ओळखला जातो.

( ३ ) जीवाची उत्पत्ति पृथ्वीवर झाली नसून तो परकीय ग्रहावरून पृथ्वीवर आला. हा सिद्धांत अऱ्हेनियस नावाच्या शास्त्रज्ञाने मांडला असून त्याची एकेकाळी शास्त्रीय जगात बरीच चलती होती.

( ४ ) जीवाची उत्पत्ति ही एक अत्यंत असंभाव्य घटना असून ती पृथ्वीवर विलक्षण योगायोगामुळे घडून आली.

या चार दृष्टिकोनापैकी क्रम दोन हा दृष्टिकोनच – उत्क्रांतिवादच–शास्त्रीय कसोटीला उतरतो असे आढळून येते.

डार्विनचा उत्क्रांतिवाद असे सांगतो की खालच्या वर्गातील सोप्या जीवापासून उच्च वर्गातील गुंतागुंतीच्या शरीररचनेचे जीव निसर्गनियमानुसार उत्क्रांत झाले आहेत. उत्क्रांतीविषयक हा दृष्टिकोन स्वीकारला तर पहिल्या जीवाची उत्पत्तीसुद्धा निसर्गनियमानुसार झाली असे मानावे लागते. पहिल्या जीवाच्या



अनुक्रमणिका

उत्क्रांतीचा प्रश्न अर्थातच मानवाच्या उत्क्रांतीच्या प्रश्नापेक्षा अधिक गुंतागुंतीचा आहे. हा प्रश्न ग्रह-मालेची उत्पत्ति, पृथ्वीची निर्मिति आणि उत्क्रांति या संबंधीच्या प्रश्नाना, त्याचप्रमाणे भूरासायनिक आणि जीवरासायनिक उत्क्रांतीसंबंधीच्या प्रश्नाना, मिळणाऱ्या उत्तरावर अवलंबून आहे. या सर्व प्रश्नाना सुसंगत उत्तरे मिळाली व ती हल्ली आढळून येणाऱ्या जीवपेशीतील जीवरासायनिक प्रक्रिये-संबंधी उपलब्ध असलेल्या माहितीशी सुसंगत ठरली तर हा प्रश्न शास्त्रीय हल्ला चढविण्याजोगा आहे असे म्हणता येईल. अलीकडील प्रयोगांना आणि संशोधनांना आलेल्या यशामुळे या प्रश्नावर शास्त्रीय हल्ला चढवून उत्तर मिळविण्याची शास्त्रज्ञांना फार मोठी आशा वाटू लागली आहे.

जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न जीवपेशीमध्ये चालणाऱ्या असंख्य जीवरासायनिक प्रक्रियासंबंधी आपणाला असलेल्या माहितीच्या आधारे हाताळला पाहिजे. जीवरासायनिक प्रक्रियेसंबंधीचे हे ज्ञान आपल्याला पूर्णांशाने आहे असे अर्थातच म्हणता येत नाही. पण म्हणून या प्रश्नावर हल्ला चढविता येत नाही असे नाही. एका अर्थाने जीवाच्या स्वरूपाविषयी आपण कोणता दृष्टिकोन स्वीकारतो यावर हा प्रश्न अवलंबून आहे. जीववाद ( vitalism ) स्वीकारला तर जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न विज्ञान-पद्धतीच्या आटोक्याबाहेर व तत्वज्ञानाच्या क्षेत्रात जातो. हा जीववादी दृष्टिकोन जीवाचे स्वरूप समजून घेताना निर्माण होणाऱ्या अडचणींचा फायदा घेऊन जीवाचे स्वरूप भौतरासायनिक नियमानी समजून घेणेच अशक्य आहे असे जाहीर करतो. आणि अशा रीतीने जीवाचे स्वरूप भौतरासायनिक नियमानी समजून घेणे अशक्य असल्यामुळे जीवाचे स्वतंत्र तत्व मानले पाहिजे असे म्हणतो. एखादी गोष्ट अशक्य आहे असे अगोदरच गृहीत धरून त्यावर एकादे तत्वज्ञान उभारणे तर्कसंगत ठरू शकेल. पण अशी तर्कसंगति विज्ञानाला क्वचितच उपकारक ठरते. विज्ञान प्रायोगिक आहे हे मान्य असेल तर वैज्ञानिक तर्क प्रथम प्रयोगांना प्रामाणिक राहिला पाहिजे हे मान्य केले पाहिजे.

## जीव हा संघटनेचा परिपाक

जीवाचे स्वरूप समजून घेताना अशा कोणत्या मोठ्या अडचणी निर्माण होतात की ज्यामुळे जीवाचे स्वरूप भौतरासायनिक नियमानी समजून घेणे अशक्य आहे व म्हणून जीवाचे स्वतंत्र तत्व मानले पाहिजे असे काहीजण म्हणतात ? जीवाच्या भौतिक स्वरूपाविषयी फार मोठ्या अडचणी निर्माण होतात असे मुळीच नाही. जिला जीवाचा अंतिम घटक म्हटले जाते ती जीवपेशी घेतली तर तिच्यामध्ये शास्त्रज्ञाना माहीत नसलेले असे एखादे वेगळे तत्व आढळून आले आहे असे मुळीच नाही. जीवपेशीचे विश्लेषण केले तर तिच्यात शास्त्रज्ञांच्या नित्य परिचयाचीच मूलद्रव्ये आढळून येतात. ही मूलद्रव्ये म्हणजे कार्बन, हायड्रोजन, ऑक्सीजन आणि नायट्रोजन ही होत. या मूलद्रव्यांमध्ये इतर मूलद्रव्याहून वेगळे व जीवविशिष्ट असे काही नाही. त्यांच्याविषयी जीवविशिष्ट असे काही असेलच तर त्यांची जीवपेशीमध्ये विशिष्टरीतीने झालेली संघटना होय. जीवपेशीतील ही संघटना स्थलकालामध्ये नियमबद्ध झाली असल्याची आढळून येते. पेशीच्या विशिष्ट भागात विशिष्ट घटकांच्या साह्याने विशिष्ट संश्लेषण–विश्लेषण प्रक्रिया चाललेल्या असतात ही गोष्ट स्थलक्रम ( spatial order ) सूचित करते. उलट या स्थलनिबद्ध प्रक्रिया पेशीमध्ये विशिष्ट क्रमाने चालतात ही गोष्ट कालक्रम ( temporal order ) सूचित करते. ( पेशींची वाढ, पुनरुत्पादन व मृत्यु हेसुद्धा कालक्रम सूचित करतात. ) स्थल-कालामध्ये नियमित झालेली ही संघटना स्थितिशील नसून गतिशील आहे हे मात्र लक्षात ठेवले पाहिजे. पेशीतील या जैविक प्रक्रिया पेशी आणि परिसर

यांच्यामध्ये सतत होणाऱ्या देवाणघेवाणीमुळे चालतात यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. किंबहुना जीवपेशीचा पेशी म्हणून स्वतंत्रपणे विचार करण्याऐवजी पेशी + परिसर असा केला तर ते अधिक सयुक्तिक होईल. कारण परिसरापासून पेशी वेगळी केली तर परिसराशी पेशीची होणारी देवाणघेवाणक्रिया बंद झाल्यामुळे पेशीचे अस्तित्वच संपुष्टात येते. अशा रीतीने पेशी ही अंतर्गत संघटनेने युक्त, पण त्याचबरोबर बाह्य परिसराशी गतिशीलरीत्या संबद्ध असलेली एक उच्च कोटीला पोचलेली संघटना आहे असे म्हणता येईल. जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न सोडवावयाचा तर ही उच्च कोटीला पोचलेली गतिशील संघटना मुळात कशी अस्तित्वात आली या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर दिले पाहिजे. ही संघटना पृथ्वीवरील प्रारंभिक समुद्रात भौतरासायनिक (उष्णता-गतिशास्त्राच्या) नियमांनी अस्तित्वात येऊ शकली हे दाखवून देता आले तर जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न सोडविल्यासारखे होईल.

## स्वतंत्र 'जीवशक्ति' अस्तित्वात आहे ?

जीवपेशीमध्ये जीवाचे स्वतंत्र तत्त्व मानावे असे काही नाही ही कल्पना अलीकडे जीवरसायनशास्त्रात झालेल्या प्रगतीमुळे शास्त्रीय जगात मान्य झाली आहे. एकोणिसाव्या शतकात मात्र सर्व सेंद्रिय पदार्थ केवळ जैविक प्रक्रियांनी म्हणजे जीवपेशीमध्येच निर्माण होणे शक्य आहे असे मानले जात होते. कारण हे पदार्थ निर्माण करण्यासाठी स्वतंत्र अशा 'जीवशक्ती'ची (Life force) गरज असून ती शक्ति केवळ पेशीतच अस्तित्वात आहे असे गृहीत धरण्यात आले होते. पण व्होलरने ऑक्झॅलिक ॲसिड व युरिया हे सेंद्रिय पदार्थ कृत्रिमरीत्या (पेशीबाहेर) निर्माण करून सेंद्रिय पदार्थांच्या निर्मितीमध्ये खास जैविक असे काही नाही हे सिद्ध केले. त्यामुळे स्वतंत्र जीवशक्तीची कल्पना हल्ली अनवश्यक ठरली आहे. हल्ली व्हिटॅमिन, ॲंटिबायोटिक्स व हॉर्मोन यासारखे अत्यंत गुंतागुंतीचे सेंद्रिय पदार्थसुद्धा कृत्रिमरीत्या (पेशीबाहेर) प्रयोगशाळेत निर्माण करण्यात आले आहेत. विशेष म्हणजे ज्याच्या साह्याने साखरेचे आल्कोहोलमध्ये रूपांतर होते त्या 'यीस्ट' नावाच्या जीवपेशीतील जीवरासायनिक प्रक्रिया हल्ली पेशीबाहेर एंझाइमच्या साह्याने कृत्रिमपणे साधण्यात आल्या आहेत. या यशामुळे जैविक प्रक्रियांची उपपत्ति देण्यासाठी स्वतंत्र 'जीवशक्ती'ला आवाहन करण्याची गरज उरलेली नाही.

स्वतंत्र 'जीवशक्ती' अस्तित्वात नाही हे एकदा सिद्ध झाल्यानंतर पृथ्वीवरील जीवाची उत्क्रांति हा भौतरसायनशास्त्रापुढील प्रश्न बनतो पण स्वतःच्या इच्छेला विश्वात आधार शोधणारा मानव इतक्या सुखासुखी पराभव स्वीकारीत नाही. ईश्वरी सिद्धांताला तो इतर आधार शोधू लागतो. पहिला एकपेशी जीव ईश्वराच्या मध्यस्थीखेरीज निर्माण होणे शक्य नाही या कल्पनेच्या समर्थनार्थ जीवपेशी हा जीवाचा अंतिम घटक असून तो 'अविभाज्य' आहे हे तत्त्वज्ञान तो उभे करतो. अंतिम आणि 'अविभाज्य' घटक निर्माण व्हावयाचा झाल्यास ईश्वराची गरज आहे असा यातील भावार्थ. अंतिमतेचे किंवा अविभाज्यतेचे हे तत्त्वज्ञान नवीन नाही. भौतिक शास्त्रात अणु हा पदार्थाचा अंतिम घटक असून तो 'अविभाज्य' आहे असे एकोणिसाव्या शतकाच्या शेवटापर्यंत मानण्यात येत होते, पण विसाव्या शतकाच्या सुरुवातीस अणूचे विदलन घडून आल्यामुळे अंतिमतेचे हे तत्त्वज्ञान धुळीस मिळाले. हीच गोष्ट जीवपेशीसंबंधीही अनुभवास आली असून पेशी हा जीवाचा अंतिम आणि 'अविभाज्य' घटक आहे ही कल्पना हल्ली खोटी ठरली आहे. जीवपेशीसुद्धा अधिक सोप्या (सेंद्रिय) पदार्थापासून हळूहळू उत्क्रांत झाली असून ती पृथ्वीच्या आरंभकालीन समुद्रातील रासायनिक उत्क्रांतीचा परिपाक आहे



अनुक्रमणिका






ही गोष्ट आता मान्य करण्यात आली आहे. अशा-रीतीने जैविक आणि रासायनिक उत्क्रांति या अविभाज्य आहेत हे सिद्ध झाले आहे.

## विश्वसंचारी जीव

पृथ्वीवरील रासायनिक उत्क्रांतीची परिणति म्हणून जीव निर्माण झाला आहे हा दृष्टिकोण स्वीकारला तर जी तत्वज्ञानात्मक अडचण निर्माण होते ती टाळण्यासाठी काही जणांनी असा सिद्धांत मांडला आहे की जीवाची उत्पत्ति पृथ्वीवर झाली नसून तो परकीय ग्रहावरून पृथ्वीवर आला आहे. जीव एका ग्रहावरून दुसऱ्या ग्रहावर सतत प्रवास करीत असेल तर जीवांच्या मूळ उत्पत्तीचा प्रश्नच टळतो. विश्वसंचारी जीवाचा हा सिद्धांत प्रथम स्वीडनच्या अऱ्हेनियस या शास्त्रज्ञाने मांडला. या सिद्धांताप्रमाणे बॅक्टेरियांची बीजे एका ग्रहावरून दुसऱ्या ग्रहावर सूर्यप्रकाशाच्या दाबाने ढकलली जात असून ती योग्य परिसर सापडताच वाढू व प्रजोत्पादन करू लागतात. आणि कालांतराने इतर जीवांची त्यांच्यापासून उत्क्रांति होते. ही बीजे सूर्यप्रकाशाच्या दाबाने ढकलली जाण्याइतकी सूक्ष्म असली तरी अवकाशात आढळून येणाऱ्या गोठनबिंदूपेक्षाही कमी तपमानात ते कसे तग धरून राहतील हा प्रश्न आहे. एक वेळ गोठन-क्रियेमध्ये त्यांचे जीवसामर्थ्य टिकून राहिले तरी अवकाशात आढळून येणाऱ्या 'क्ष' व 'विश्व' किरणाच्या माऱ्याला ते कसे तोंड देऊ शकतील हा दुसरा प्रश्न आहे. कसल्याही प्रतिरोधक बॅक्टेरियांचा या किरणाविरुद्ध टिकाव लागत नाही असे प्रयोगांती आढळून आले आहे. ही अडचण टाळण्यासाठी ही बीजे सुटी येण्याऐवजी उल्कांमधून येतात असे प्रतिपादण्यात येऊ लागले. पण उल्कामध्ये अद्याप-पावेतो एकही बॅक्टेरिया किंवा त्याचे बीज आढळून आलेले नसल्यामुळे या सिद्धांतामधील फोलपणा उघड झाला आहे. काही उल्कामध्ये आढळून येणाऱ्या हायड्रोकार्बनसारख्या सेंद्रिय पदार्थावरून त्या उल्का जीववस्ती असलेल्या ग्रहापासून आल्या असाव्यात असाही एक तर्क रचण्यात आला आहे. अर्थात् सेंद्रिय पदार्थ केवळ जीवपेशीतच निर्माण होऊ शकतात या कल्पनेवर हा तर्क आधारला आहे. पण सेंद्रिय पदार्थ भौतरासायनिक प्रक्रियांनीसुद्धा निर्माण होऊ शकतात असे आढळून येते. अशा रीतीने सर्व दृष्टीनी विचार केला असता हा विश्वसंचारी जीवाचा सिद्धांत सपशेल कोलमडतो. पण पृथ्वीवर परकीय ग्रहावरून जीव आला हे क्षणभर मान्य केले तरी या परकीय ग्रहावर तो कोठून आला हा प्रश्न शिल्लकच राहतो. जीव अनादि असून तो एका ग्रहावरून दुसऱ्या ग्रहावर फिरत राहतो असे मानावयाचे झाले तर जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न टळतो आणि एक तत्वज्ञानात्मक अडचण दूर होते यात शंका नाही. पण मग अशा रीतीने जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न टाळणे आणि परमेश्वरावर तो सोपवून स्वस्थ बसणे यामध्ये तत्वतः काय फरक आहे ?

## पृथ्वीवरील पहिला ' अपघात '

जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न टाळण्याऐवजी त्याला सरळ तोंड दिले पाहिजे हे एकदा मान्य केल्यानंतर त्याची पृथ्वीवर कशी उत्पत्ति झाली या प्रश्नाचे उत्तर शोधणे भाग आहे. एक काळ असा होता की जेव्हा कुजलेल्या मांसात आपोआप किडे निर्माण होतात, चिखलापासून बेडूक आपोआप तयार होतात इ. भ्रामक कल्पना लोकामध्ये रूढ होत्या. अशा भ्रामक कल्पना बाळगणाऱ्यांमध्ये ॲरिस्टॉटल, देकार्त, हेगेल यासारखे तत्वज्ञ व पॅरॅसेल्सस, बेकन, व्हॅन हेल्मॉन्ट, हार्वे यासारखे प्रसिद्ध शास्त्रज्ञही होते. (व्हॅन हेल्मॉन्ट हा तर धान्यापासून २१ दिवसात उंदीर निर्माण करण्याची एक पद्धतीसुद्धा तपशीलाने वर्णन करून सांगतो !) निर्जीव पदार्थापासून या पद्धतीने जीव निर्माण होत असेल तर जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न आपोआप सुटतो. पण रेडी, स्पॅलांझनी, पाश्चर इ. शास्त्रज्ञानी या सिद्धांतामधील फोलपणा सप्रयोग सिद्ध केला आहे.








या सिद्धांतामधील फोलपणा सिद्ध झाला असला तरी तो सिद्धांत हल्ली निराळ्या स्वरूपात प्रचलित असल्याचा आढळून येतो. मागे उल्लेख केलेला नंबर ( ४ ) चा सिद्धांत याच धर्तीचा आहे. या सिद्धांतानुसार पृथ्वीवर जीव अगदी आगंतुकपणे, अपघाताने, निर्माण झाला. जीवाची उत्पत्ति काकतालीय न्यायाने, योगायोगाने, झाली असून ती होणे अपरिहार्य नव्हते. हा अर्थातच शास्त्रीय सिद्धांत म्हणता येत नाही. कारण जी घटना केवळ योगायोगाने घडली ती खरी आहे की खोटी हे प्रयोगाने पडताळून पाहणे अशक्य आहे.

पण या सिद्धांतामधील मुख्य अडचण अशी की सांप्रतकालीन सर्वांत सोपा जीव घेतला तरी तो इतका गुंतागुंतीच्या प्रक्रियानी युक्त असल्याचा आढळून येतो की तो केवळ अपघाताने कसा निर्माण होईल हा प्रश्न आहे. सर्वांत सोप्या जीवपेशीमध्येसुद्धा असंख्य जीवरासायनिक प्रक्रिया इतक्या काटेकोरपणे आणि सुसंबद्धपणे चाललेल्या असतात की जीवपेशीला त्यामुळे विशिष्ट स्थळी, विशिष्ट वेळी, विशिष्ट प्रकारची जीवद्रव्ये निर्माण करणे शक्य होते. स्थलकालामधील या संघटनेमुळे जीवपेशी 'हेतुपूर्वक' वागत असल्याचे आढळून येते. अशाप्रकारची हेतुपूर्ण आणि उच्च कोटीला पोचलेली संघटना हळूहळू आणि उत्क्रांतीच्या प्रक्रियेनेच निर्माण होणे शक्य आहे. कितीही अनुकूल परिस्थितीमध्ये केवळ योगायोगाने ही संघटना निर्माण होणार नाही.

## एंझाइम आणि प्रजोत्पादक रेणू

पेशीतील जीवरासायनिक प्रक्रिया अत्यंत गुंतागुंतीच्या पण त्याचबरोबर अत्यंत काटेकोर असतात ही गोष्ट जीवरसायनशास्त्रात दृढ होताच वरील सिद्धांतामधील फोलपणा सामान्यतः मान्य करण्यात आला. पेशीमध्ये चालणाऱ्या असंख्य जीवरासायनिक प्रक्रियांचा परिणाम म्हणून जी जीवद्रव्ये निर्माण होतात ती उत्क्रांतीच्या प्रक्रियेमध्ये पेशीला उपयोगी पडल्यामुळे निर्माण झाली असून ती निर्माण करणारी यंत्रणाही हळूहळू उत्क्रांत झाली आहे हे आता मान्य करण्यात आले आहे. जीवद्रव्ये निर्माण करण्याची ( किंवा उपयोग करण्याची ) ही यंत्रणा एंझाइम नावाच्या प्रोटीनच्या साह्याने चालत असून हे एंझाइम प्रोटीनच एका अर्थाने जीवाचा मूलाधार म्हणता येतील. काहीनी हे एंझाइम प्रोटीनच प्रथम प्रारंभिक समुद्रात योगायोगाने निर्माण झाले असावेत असे मानले आहे. पण जी गोष्ट पेशीची तीच या एंझाइमची म्हणता येईल. हे एंझाइमसुद्धा अत्यंत गुंतागुंतीचे असून त्यांच्या वेगवर्धक गुणाची व रचनेची उपपत्ति लावण्यासाठी उत्क्रांतिवादाचीच कास धरली पाहिजे. म्हणजे जीवपेशीतील जीवरासायनिक गरजानुसार त्यांची पेशीत उत्क्रांति झाली आहे असे मानले पाहिजे. हल्लीच्या पेशीत जे कार्य हे एंझाइम करतात ते कार्य पेशीच्या उत्पत्तीनंतरच शक्य असल्याने त्यांची उत्पत्ति पेशीनंतरची ( किंवा फार तर पेशीबरोबरची ) मानली पाहिजे. पेशीच्या उत्पत्तीपूर्वी पेशीतील एंझाइम निर्माण झाले असे म्हणणे म्हणजे मानवाच्या उत्पत्तीपूर्वी मानवाचे पाय निर्माण झाले असे म्हणण्यासारखे आहे !

एंझाइमची ही गत झालेली पाहून RNA ( रिबोन्युक्लिक ॲसिड ) व DNA ( डिसॉक्झीरिबोन्युक्लिक ॲसिड ) या नावाने ओळखल्या जाणाऱ्या केंद्राम्ल रेणूंना पुढे करण्यात आले. हे रेणू पेशी–केंद्रातील 'जीन' या आनुवंशिक गुण ठरविणाऱ्या घटकामध्ये आढळून येत असून ते प्रजोत्पादक गुणाने युक्त असल्याचे आढळून येतात. हे रेणू प्रजोत्पादन करू शकत असल्यामुळे व प्रजोत्पादन हे जीवाचे व्यवच्छेदक लक्षण मानले गेले असल्यामुळे या रेणूंच्या उत्पत्तीला जीवाच्या उत्पत्तीच्या संदर्भात विशेष महत्त्व दिले जाणे स्वाभाविक आहे. किंबहुना हे रेणू जीवपेशीच्या उत्पत्ती-





अनुक्रमणिका

पूर्वी प्रारंभिक समुद्रात योगायोगाने निर्माण झाले असे प्रतिपादण्यात आले आहे. हे रेणू सांप्रतकालीन पेशीमध्ये अगोदर अस्तित्वात असलेल्या त्याच प्रकारच्या रेणूपासून निर्माण होतात. एंझाइमप्रमाणेच या रेणूंची निर्मितीसुद्धा पेशीच्या उत्क्रांती-मध्येच झाली असे मानले पाहिजे. एंझाइम्‌च्या वेग-वर्धक गुणाप्रमाणेच या केंद्राम्ल रेणूंचा प्रजोत्पादक गुणसुद्धा पेशीला उपयोगी पडल्यामुळेच उत्क्रांत झाला असे मानले पाहिजे. यावर असे सांगण्यात येते की या प्रकारचा पहिला रेणू पहिल्याने केवळ योगा-योगाने निर्माण झाल्यानंतर तो प्रजोत्पादन करू लागला. कारण ' प्रजोत्पादनाचे सामर्थ्य ' हा गुण घेऊनच तो रेणू निर्माण झाला. हे रेणू जन्मतःच प्रजोत्पादन गुणाने युक्त होते व त्यांचा जन्म योगा-योगाने झाला हे क्षणभर मान्य केले तरी ते पेशी-बाहेर कसे प्रजोत्पादन करू शकतील हा प्रश्न आहे. हल्ली हे रेणू केवळ पेशीतच प्रजोत्पादन करू शकतात. हल्लीच्या पेशीमध्ये या रेणूंच्या प्रजो-त्पादनासाठी अनेक एंझाइम्‌सच्या मध्यस्थीची जरूरी असून ही क्रिया स्थलकालामध्ये इतकी नियमबद्ध झाली आहे की तिच्यात किंचित् फरक पडला तरी सर्व यंत्रणा विस्कळित होते. याचा अर्थ असा की या रेणूंच्या प्रजोत्पादनासाठी पेशीसारख्या अत्यंत उच्च कोटीला पोचलेल्या जीवरासायनिक संघटनेची नितांत आवश्यकता आहे. या संघटनेच्या अभावी या रेणूंचे प्रजोत्पादन अशक्य आहे. ( ही गोष्ट व्हाय-रसवरील प्रयोगावरून स्पष्ट झाली आहे. ). वस्तुतः हे रेणू पेशीबाहेर प्रजोत्पादन करू शकणार नाहीत, इतकेच नव्हे तर ते योगायोगाने निर्माणही होणार नाहीत. एंपीडॉक्लीस या ग्रीक तत्वज्ञाने मानवाच्या उत्पत्तीविषयक एक असा सिद्धांत मांडला आहे की प्रथम मानवाचे डोळे, नाक, कपाळ इ. अवयव पृथ्वीमधून उत्पन्न झाले व नंतर त्यापासून मनुष्य तयार झाला ! एंझाइम व प्रजोत्पादक रेणूंच्या उत्पत्तीविषयक वरील सिद्धांत याच धर्तीचा आहे. कारण हे रेणू अगोदर स्वतंत्रपणे निर्माण झाले व नंतर त्यापासून पेशी तयार झाली असे हा सिद्धांत सांगतो. पण जी गोष्ट मानवाच्या उत्क्रांतीची तीच पेशीच्या उत्क्रांतीची. मानवाला अगर कोणत्याही प्राण्याला विशिष्ट अवयवांची गरज व उपयोग असल्या-मुळेच ते अवयव त्याच्यात उत्क्रांत झाले आहेत. उदा० पाहण्याची क्रिया स्वतः डोळ्याना उपयोगी नसून डोळे धारण करणाऱ्या प्राण्याला उपयोगी असल्याने ते त्या प्राण्यात उत्क्रांत झाले आहेत. त्याचप्रमाणे या रेणूंचा प्रजोत्पादनाचा गुण स्वतः त्या रेणूना उपयोगी नसून पेशीला उपयोगी अस-ल्याने ते पेशीत उत्क्रांत झाले आहेत.

### कालो ह्ययं निरवधिः

शिवाय RNA व DNA हे प्रजोत्पादक रेणू किंवा एंझाइम्स इतके गुंतागुंतीचे आहेत आणि त्यांची वर्तणूक इतकी ' हेतुपूर्ण ' आढळून येते ( म्हणजे त्यांची रचना आणि कार्य यामध्ये इतका मेळ आढळून येतो ) की ही संघटना केवळ योगा-योगाने कशी निर्माण होईल हा प्रश्न आहे. यावर असे सांगण्यात येते की हा केवळ काळाचा प्रश्न आहे. पुरेसा काळ उपलब्ध असेल तर ही गोष्ट अशक्य नाही, आणि काल तर हवा तितका आहे. पृथ्वीची निर्मिति ४ ते ५ अब्ज वर्षांपूर्वी मानली आणि जीवाची उत्पत्ति २ अब्ज वर्षांपूर्वी मानली तरीसुद्धा २ ते ३ अब्ज वर्षे ही ' असंभाव्य घटना ' घडण्यास मिळतात. आणि या अवधीत अणूंची वाटेल ती आगंतुक संघटना निर्माण होणे अशक्य नाही. एखादी समस्या शास्त्रीय पद्धतीने सोडविण्यात अडचणी निर्माण झाल्या तर ती काळा-वर सोपवून दिल्याने ' सुटते ' असे जे मानतात त्यांच्या शास्त्रीय दृष्टिकोनाविषयी काय बोलावे ? पण या पद्धतीने ही समस्या सुटते असे मानले तरी पेशीच्या निर्मितीची समस्या त्याने सुटत नाही. हे

रेणू आगंतुकपणे निर्माण झाले असे मानले तरी पेशीच्या जन्माला ते कसे कारणीभूत होतील हा प्रश्न आहे. यासाठी पेशीची हळूहळू उत्क्रांति झाली असेच मानणे भाग आहे. पण उत्क्रांतीचे तत्त्व पेशीला लागू केल्यानंतर पेशीतील प्रजोत्पादक रेणूंनाही ते आपोआपच लागू होते. म्हणजे पेशीतील RNA व DNA हे प्रजोत्पादक रेणू व एंझाइम्स पेशीच्या उत्क्रांतीमध्येच निर्माण झाले असे मानावे लागते.

## हाल्डेन आणि मिल्ने

योगायोगाचे सिद्धांत विचारातून वगळल्यानंतर उत्क्रांतिवादी सिद्धांतच काय तो शिल्लक राहतो. या सिद्धांतानुसार उत्क्रांतीची प्रक्रिया अविच्छिन्न असल्यामुळे पृथ्वीवरील पहिल्या जीवाची उत्क्रांति पृथ्वीवरील ज्या प्रारंभिक परिस्थितीमधून झाली त्या परिस्थितीच्या उत्क्रांतीचा मागोवा घेतल्याखेरीज अभ्यासिता येणार नाही. पृथ्वीवरील ही प्रारंभिक परिस्थिति कृत्रिमपणे प्रयोगशाळेत निर्माण करून जीवाच्या उत्पत्तीविषयक या सिद्धांताची कसोटी पाहता येते. पण समजा हे प्रयोग अयशस्वी झाले तर जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न न सुटणारा मानावयाचा काय ? जे. बी. एस्. हाल्डेन यानी असे सुचविले आहे की जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न सोडविण्यात अपयश आले तर निसर्गनियमात घडून येणाऱ्या ऐहिक बदलांचा पर्याय शोधला पाहिजे. निसर्गनियमात असे ऐहिक बदल घडून येत असल्याचे मिल्ने या भौतिकशास्त्रज्ञाने निगमन पद्धतीने काढलेल्या विश्वविषयक निष्कर्षातून सूचित होते. या निष्कर्षानुसार भौतिक बदलांच्या तुलनेने रासायनिक बदलांचा वेग कालानुसार वाढत आहे. पण जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न सोडविण्यासाठी अशा निर्वाणीचा मार्ग शोधणे हे हा प्रश्न येन केन प्रकाराने सोडविण्याचाच प्रयत्न आहे असे सूचित करते. दुसरे असे की ज्या पद्धतीने मिल्ने यानी हे निष्कर्ष काढले आहेत त्या निगमन पद्धतीवर काहीनी कडक टीका केली असून ते निष्कर्ष भौतिकशास्त्रात सर्वमान्य झालेले नाहीत, पण या निर्वाणापर्यंत जाण्यासारखी निराशजनक परिस्थिति मुळातच नसताना हा खटाटोप कशासाठी हा प्रश्न आहे. ( या गोष्टीचा येथे मुद्दाम उल्लेख करण्याचे कारण असे की जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न कधी कधी अनपेक्षित दिशेने सुटण्याचीसुद्धा शक्यता दृष्टिआड करता येत नाही. )

## काही आक्षेपांचा विचार

रासायनिक उत्क्रांतीचा परिपाक म्हणून जीवाची उत्पत्ति झाली आहे या दृष्टिकोणाविरुद्ध काही आक्षेप उपस्थित करणे शक्य असल्याने या आक्षेपाचा शेवटी विचार करणे क्रमप्राप्त ठरते. पहिला आक्षेप असा की जी घटना पृथ्वीच्या प्रारंभकाळी, अब्जावधि वर्षापूर्वी घडली त्या घटनेसंबंधी हल्ली अनुमान रचणे धाडसाचे आहे. हा आक्षेप सर्व विज्ञानाविरुद्ध उपस्थित करणे शक्य असल्याने त्याचा विशेष विचार करण्याची जरूरी नाही. एखादी घटना फार पूर्वी घडली ( किंवा फार दूर घडली ) म्हणून तिच्यासंबंधी कसलीच माहिती मिळणार नाही ही कल्पना एक तर विज्ञानपूर्व कालातील आहे किंवा ती विज्ञानाच्या पद्धतीविषयीच्या अज्ञानातून जन्मली आहे.

दुसरा आक्षेप असा की, निर्जीव पदार्थापासून जीवाची उत्पत्ति पूर्वी एकदा झाली असेल, तर ती हल्ली का होत नाही ? याला उत्तर असे की पृथ्वीच्या ज्या प्रारंभिक परिस्थितीत जीवाची उत्पत्ति झाली त्या परिस्थितीमध्ये जीवाच्या उत्पत्तीमुळे संपूर्ण बदल घडून आला आहे. जीवहीन पृथ्वीवर जी गोष्ट शक्य होती ती गोष्ट जीवयुक्त पृथ्वीवर शक्य नाही. यदाकदाचित् हल्ली सोपे जीव निर्माण झालेच तर जीवन झगड्यात यशस्वी झालेल्या प्रगत जीवांचे ते भक्ष्य बनून त्यांचे अस्तित्व आपल्याला माहीत होण्यापूर्वीच ते नष्ट झालेले असतील. सागराच्या खोल तळाशी सेंद्रिय पदार्थापासून जीवाची उत्पत्ति












हल्लीसुद्धा होत असण्याची शक्यता बोलून दाखविण्यात आली असली तरी ही गोष्ट सिद्ध करणे फार कठीण आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.

तिसरा आक्षेप असा की जड पदार्थापासून जीवाची उत्पत्ति झाली असेल तर जड पदार्थ आणि जीव याना जोडणारा एकादा दुवा आढळून आला पाहिजे. पण असा दुवा हल्ली आढळून येत नाही. वस्तुतः हा दुवा म्हणजे व्हायरसच होय. पण व्हायरस दुवा मानावयाचा नसेल तर तो हल्ली आढळून येत नाही म्हणून तो निर्माणच झाला नाही असे म्हणता येणार नाही. उत्क्रांतीच्या टप्प्यामध्ये दोन भिन्न जीवरूपानां जोडणारे अशाप्रकारचे असंख्य दुवे कालाच्या उदरात गडप झाले आहेत. ( यूग्लेना, बेलेनोग्लॉसिस, पॅरीपॅटस यासारख्या अपवादावरून हाच नियम सिद्ध होतो. )

चौथा आक्षेप असा की जीव हा जड पदार्थाहून गुणात्मक दृष्ट्या भिन्न असल्याने तो जड पदार्थापासून जड नियमानुसार निर्माण होणार नाही. कारण तो जड नियमानुसार निर्माण झाला तर तो गुणात्मक दृष्ट्या भिन्न ठरणार नाही. जिवंत आणि जड पदार्थ यांच्यामध्ये गुणात्मक किंवा निरपेक्ष (absolute) भेद आहे असे या आक्षेपात गृहीत धरले आहे. जिवंत आणि जड पदार्थ यांच्यामधील संबंधविषयक हा दृष्टिकोन तत्वज्ञानात्मक असून त्याला वैज्ञानिक आधार नाही. उत्क्रांतिवादी दृष्टिकोण जीव आणि जड पदार्थ यांच्यामध्ये गुणात्मक किंवा निरपेक्ष आहे असे मानत नाही. या उत्क्रांतिवादी दृष्टिकोनानुसार जिवंतपणा आणि जडत्व ही स्वतंत्र तत्वे नसून एकाच पदार्थांची गतिशीलतेमुळे निर्माण झालेली भिन्न रूपे होत. अनेक व्यक्ति एकत्र आल्यामुळे जो जमाव तयार होतो तो कधीकधी स्वतंत्र मन असलेल्या व्यक्तीप्रमाणे सांघिकपणे व उत्स्फूर्तपणे वागतो ही गोष्ट सर्वांच्या परिचयाची आहे. पण म्हणून जमाव ही स्वतंत्र मन असलेली व्यक्ति आहे असे कोणी म्हणत नाही. हीच गोष्ट जीवालाही लागू आहे. अनेक अणूंच्या संघटनेतून जीव निर्माण होतो व स्वतंत्र शक्ति असल्याप्रमाणे तो वागतो म्हणून जीव ही एक स्वतंत्र शक्ति अगर तत्त्व आहे असे मानण्याचे कारण नाही. जीववाद (vitalism) हीच चूक करतो. उलट जडवाद दुसऱ्या टोकाला जाऊन जीव म्हणजे अणूंच्या संघाताखेरीज दुसरे काही नाही असे जाहीर करतो. हे दोन दृष्टिकोन दोन टोकाना जाऊन जीवाचे स्वरूप कृत्रिम आणि सोपे करतात. जीव हे एक स्वतंत्र तत्त्व आहे किंवा तो केवळ अणूंचा संघात आहे या कल्पना जीवशास्त्रातील प्रगतीला यत्किंचितही हातभार लावू शकलेल्या नाहीत. उलट जीव हा चलनवलनात्मक असून तो संघटनेचा परिपाक आहे ही कल्पना मात्र बरीच उपयुक्त ठरली आहे. या गतिशीलतेच्या दृष्टिकोनातून जीवाचा अभ्यास केला तर जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न शास्त्रीय पद्धतीने सोडविणे शक्य आहे असे आढळून येते.

---


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# ज्योत तेवत ठेवा...



आपणामध्ये तेवत असलेली ज्योत,
हिमालयावरील अभ्रे दूर
करील व तीमुळे अंधःकार कायमचा नाहीसा होईल.
या दिवाळींत आपल्या कर्तव्याशी अविचल राहून
आपण या ज्योतीशी अेकनिष्ठ राहू या
अधिक काम करू या, खर्च कमी करू या.
आणि आपल्या जवळील सर्वोत्कृष्ट असे
सर्व मातृभूमीस अर्पण करू या.

प्रसिद्धी संचालक, महाराष्ट्र शासन. मुंबई

श्री. भि. वि. मराठे

# चिनी आक्रमण आणि कम्युनिझमचे भवितव्य

१९ व्या शतकात कम्युनिझमरूपी आग्यावेताळ आणि २० व्या शतकात अणुबॉम्बरूपी भस्मासुर – या दोन घटना वैशिष्ट्यपूर्ण आहेत. मानवतावादी व उदात्त हेतूने प्रेरित होऊनच कार्ल मार्क्सने कम्युनिझमचा सिद्धान्त मांडला. आइनस्टीनने तशाच हेतूने अणुतेजाचा शास्त्रीय सिद्धान्त सूचित केला. आज दोघांचही आत्मे 'हे फल काय मम तपाला' म्हणून दुःखीकष्टी असतील. माकडाच्या हाती कोलीत दिल्याचा त्याना पश्चाताप होत असेल. ज्याअर्थी ख्रिश्चन धर्म वाटेल तो स्वीकारतो आहे, त्याअर्थी त्या धर्मात दोष असले पाहिजेत– हे बर्नार्ड शॉचे उद्‌गार आहेत. कम्युनिझमचेही असेच झाले आहे. विशेषतः मागासलेल्या राष्ट्रात तो रुजत असल्यामुळे शॉचे उद्‌गार अधिक सार्थ ठरतात. शिवाय ख्रिश्चन धर्म व कम्युनिझम याचे ध्येय व इतिहासवाद (Historicism) या बाबतीत बरेच साम्य आहे. ख्रिश्चन धर्मानुसार इतिहासाला निश्चित आदि व अन्त असून तो अन्ताच्या दिशेने विकसित होत आहे. आणि येशू ख्रिस्ताच्या हालअपेष्टा व यातना याच्याद्वारे शेवटी मानवजात पापमुक्त होऊन पृथ्वीतलावर सुवर्णयुग निर्माण होणार आहे. मार्क्सचा ऐतिहासिक नियतिवाद (Historical Determinism) हेच सांगतो. कामगारवर्गाकडे (Proletariat) प्रेषिताची भूमिका आहे आणि शेवटी या वर्गाची हुकुमशाही पृथ्वीवर नंदनवन निर्माण करणार आहे. [ "It (Communism) is the real end of the quarrel between man and nature, between man and man, between essence and existence, between externalization and affirmation of self, between liberty and necessity, between individual and the species. It solves the mystery of history and is aware of having solved it." — Marx ] १९१७ सालच्या संग्रामात आपण स्वर्गाच्या दाराशी लढत आहोत असा जर्मन कम्युनिस्टांचा दावा होता. क्रांति फसली आणि पुढाऱ्यांचे खून झाले. त्याच सुमारास रशियात कम्युनिस्ट क्रांति झाली आणि आज चीनमध्येही कम्युनिस्ट क्रांति झालेली आपण पाहात आहोतच. पण स्वर्गाचे दरवाजे उघडणे तर दूरच राहो, मानवजात नरकाच्या खाईत लोटली जाणार की काय अशी भीति निर्माण झाली आहे! सुप्रसिद्ध फ्रेंच विचारवंत अल्बर्ट कॅम्यू यानी या ऐतिहासिक वस्तुस्थितीवर मार्मिक व मौलिक भाष्य केले आहे: ("But every kind of socialism is Utopian, most of all scientific socialism. Utopia replaces God by the future. Then it proceeds to identify the future with ethics; the only values are those which serve this particular future. For that reason Utopias have almost always been coercive and authoritarian": –Albert Camus in 'The Rebel')

'चीनचे भारतावर आक्रमण' (China Invades India) या नामाभिधानाचा इंग्रजी भाषेतून लिहिलेला एक ग्रंथ नुकताच प्रसिद्ध झाला आहे. या ग्रंथाच्या परीक्षणाचे निमित्तानेच वरील प्रास्ताविक विचार प्रगट केले आहेत. कारण असे की, भारतात समाजवादी निष्ठा फार बोकाळली आहे आणि ही समाजवादी निष्ठा चीनच्या साम्यवादी निष्ठेशी सामना द्यावयास सज्ज झालेली आहे. या संदर्भात वरील विचार अस्थानी तर नाहीतच, पण उद्बोधक ठरतील.

'चीनचे भारतावर आक्रमण' हा ग्रंथ पाच निबंधांचा एक संग्रह असून सुप्रसिद्ध राजकीय विचारवंत

व टीकाकार, तसेच कामगार संघटनेतील एक नेते श्री. वसंत भगवंत कर्णिक यांनी त्याचे संपादन केले आहे. पहिला निबंध पाया आणि नंतरचे इमारतीचे दर्शनी भाग मानले तर शेवटी परिशिष्ट म्हणून जोडलेला श्री. मानवेंद्र रॉय यांचा लेख या इमारतीचा सुवर्ण-कळस ठरेल. संपादकीय टिप्पणीमध्ये म्हटल्याप्रमाणे या निबंधसंग्रहात नवीन असे काहीच नाही. या विषयावरील अन्य ग्रंथ, तसेच नियतकालिके, वृत्तपत्रे याद्वारे उपलब्ध असलेल्या माहितीवरच हा ग्रंथ आधारित आहे. चिनी आक्रमणाचा शोध नि बोध घेण्याचे दृष्टीने हा ग्रंथ उपयुक्त ठरेल अशी आशा संपादकमहाशयांनी प्रगट केली आहे. या परीक्षणाचा हेतुदेखील हा शोध नि बोध घेणे हाच आहे.

### चीनचा युगप्रवास

श्री. व. भ. कर्णिक यांनी लिहिलेल्या 'चीनचा युगप्रवास' (China through Ages) या पहिल्या निबंधात चीनच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहासाचा आढावा घेतलेला आहे. चीनच्या राजकीय, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक जीवनाचा इतिहास आणि त्याचा आधुनिक चीनच्या घडणीवर पडलेला प्रभाव याचे हे संक्षिप्त निवेदन आहे.

सिया (इसवी सनपूर्व २००० वर्षे) राजघराण्याच्या प्रारंभापासून शांग, चौ, चीन वगैरे भिन्नभिन्न राजघराणी आणि शेवटी मांचू राजघराण्याचा अंत व १९११ ची लोकसत्ताक क्रांति येथपर्यंतचा इतिहास म्हणजे या राजघराण्यांचा उदय व अस्त, स्वाऱ्या नि लढाया, आक्रमण नि साम्राज्यविस्तार, या घटनांचा इतिहास आहे. भारताच्या प्राचीन इतिहासाशी यांचे बरेच साम्य आहे. हान राजघराण्याची कारकीर्द म्हणजे प्राचीन चीनच्या वैभवाचा कळस! आजही 'हानचे पुत्र (Sons of Han)' म्हणवून घेण्यात चिन्यांना भूषण वाटते. याच काळात कन्फुशियसच्या तत्त्वज्ञानाचा चीनवर पडलेला प्रभाव, तदनंतर बुद्धधर्माचे पदार्पण, प्रभाव आणि शेवटी पीछेहाट इत्यादि घटनांचे निवेदन आहे. पुढे अफुयुद्ध, ब्रिटिश आणि त्यामागून अन्य पाश्चात्य राष्ट्रांचा व्यापाराच्या निमित्ताने चीनमध्ये चंचुप्रवेश वगैरे घटना वर्णिल्या आहेत. अर्वाचीन इतिहास १९११ च्या क्रांतीपासून सुरुवात होते. १९१२ साली सन्यत्सेनच्या नेतृत्वाखाली चिनी लोकसत्ताक राज्याची प्रतिष्ठापना क्युओ मिन टँग (Kuo Min Tang) या जनतेच्या राष्ट्रीय पक्षाची स्थापना, पहिले महायुद्ध आणि जपानची चीनवरील सत्ता, कम्युनिस्ट रशियाचा चिनी राजकारणात प्रवेश, च्यांग कैशेक आणि चिनी कम्युनिस्ट पक्ष, दुसरे महायुद्ध, आणि शेवटी च्यांग कैशेकच्या राज्यसत्तेचा पाडाव नि कम्युनिस्ट राज्यक्रांति –असा हा अर्वाचीन चीनचा सुसंगतवार इतिहास आहे.

या प्राचीन व अर्वाचीन इतिहासाचे आधुनिक चिनी जीवनावर घडलेल्या परिणामांचे श्री. कर्णिककृत भाष्य उद्बोधक आहे. कन्फुशियसच्या तत्वज्ञानाचा चिनी मनावरील पगडा फार खोलवर रुजलेला आहे. भूतकालाभिमुख होण्याची सर्वसाधारण जनतेचीच नव्हे तर कम्युनिस्टांचीही वृत्ति यातूनच उद्भवलेली आहे. चिन्यांचा धर्म असा कोणताच नाही, पण कन्फुशियसवाद हा निराळ्या अर्थाने त्यांचा धर्मच बनला आहे. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात पाश्चात्य संस्कृतीच्या प्रभावामुळे कन्फुशियसवादाची चिनी मनावरील पकड थोडी ढिली पडली. तरी पुढे कन्फुशियसचे तत्वज्ञान व कम्युनिस्ट तत्वज्ञान यातील समुदायवाद व व्यक्तिस्वातंत्र्यविरोध या बाबतीतील साधर्म्यामुळे, साध्य-साधन–शुचितेचा विधिनिषेध न बाळगणाऱ्या कम्युनिस्ट राजवटीने कन्फुशियसचा सोयीनुसार उपयोग करून घेण्यास मागेपुढे पाहिले नाही. चिनी जनतेला राजकीय जीवनात स्वारस्य नव्हते नि स्थानही नव्हते. राज्यकर्ते तिचा केवळ प्याद्यासारखा उपयोग करीत. आजचेही राज्यकर्ते तेच करीत आहेत. या कृषिप्रधान देशातील शेतकऱ्याचे जीवन फारच कष्टाचे नि दारिद्र्याने गांजलेले. लंगोटीएवढ्या जमिनीच्या तुकड्यावर निसर्गप्रकोपाशी झुंज देत खडतर जीवन कसे तरी जगायचे! यामुळेच की काय चिनी माणूस फार काटक आणि कष्टाळू बनलेला आहे. जगातील सात आश्चर्यांपैकी एक अशी चिनी भिंत बांधून काढण्याकरिता त्याना राबविले गेले आणि आजच्या कम्युनिस्ट राजवटीलाही कम्यूनमध्ये वा लष्करात 'मुकी








बिचारी कुणी हाका ' या न्यायाने त्यांना राबवून घेणे सुलभ झाले आहे. दारिद्र्याने गांजलेली चिनी जनता लष्करात रंगरूटभरती करून घ्यायला सहज व मुबलक उपलब्ध आहे. व्यवहारी व ऐहिक चिनी जीवनावर बुद्ध धर्माचा प्रभाव पडू शकला नाही. शेवटी तो अस्तंगत झाला. सामायिक कुटुंबाधिष्ठित व पितृप्रधान अशा पारंपरिक चिनी समाजरचनेवर औद्योगीकरणाचा परिणाम होऊन विघटन होत आहे. भारताप्रमाणे चीनमध्ये वर्णभेद वा जातिभेद नाही. चिन्यांना आपल्या संस्कृतीचा फार दांडगा अभिमान. आपणच खरेखुरे सुसंस्कृत, बाकीचे जग मागासलेले, रानटी, अशी त्यांची हिटलरी वृत्ति ! त्यांच्या आक्रमक वृत्तीची बीजे या भावनेतूनच जन्माला आली असली पाहिजेत. आणि आता तर कम्युनिझमच्या नवसंस्कृतीचे ( ! ) या परंपरागत भावनेस खतपाणी मिळत आहे. देशाचा अफाट विस्तार, कोटीकोटी मनुष्यबळ, कद्रीभूत पोलादी सत्ता, विराट लष्करी सामर्थ्य, आक्रमक राष्ट्रीय वृत्ति, आणि या सर्वांवर कळस म्हणजे कम्युनिझमचे हुकुमशाही तत्त्वज्ञान, यांच्या आधारावर चीनमध्ये एक सवाई हिटलरशाहीच जन्माला आली आहे.

## कम्युनिस्ट राजवटीखालील चीन

श्री. देवीदास केणी यांनी ' कम्युनिस्ट राजवटी खालील चीन ' ( China Under Communism ) या शीर्षकाने लिहिलेला निबंध श्री. कर्णिक यांनी निवेदन केलेल्या चीनच्या इतिहासाशीच सुसंगत असा पुढील व अगदी अलीकडचा इतिहास आहे.

पहिल्या महायुद्धानंतर रशियन कम्युनिस्टांच्या प्रेरणेने चीनमध्ये ' चिनी कम्युनिस्ट पक्ष ' स्थापन झाला. सन् यत्सेनच्या मृत्यूपर्यंत कम्युनिस्टांनी क्युओ मिन टँगमध्ये शिरून पक्षबल व संघटना वाढविण्याकरिता K M T चा उपयोग करून घेतला. K M T चे नेतृत्व हाती घेऊन १९२६ मध्ये च्यांग–कैशेकने K M T मधून कम्युनिस्टांची हकालपट्टी केली, त्यांचे शिरकाण केले. पुढे माओ त्सेतुंगकडे कम्युनिस्ट पक्षाचे नेतृत्व आले. त्याने दारिद्र्याने गांजलेल्या, शेतकरीवर्गाची संघटनेच्या दृष्टीने नाडी ओळखून त्यांना लष्करीदृष्ट्या संघटित करण्याचे धोरण आखले. पक्षसंघटना मजबूत केली. जपानी आक्रमणाविरुद्ध K. M. T व C. P. C. ( चिनी कम्युनिस्ट पक्ष ) यांची संयुक्त आघाडी ( United Front ) उभारण्याचा कम्युनिस्टांनी च्यांगशी करार केला ( १९३७ ). संयुक्त आघाडीच्या कपटी, कावेबाज, विश्वासघातकी अशा सुपरिचित तंत्राने कम्युनिस्टांनी जपानी आक्रमणविरोधाऐवजी आपली पक्षसंघटना, लष्करीबळ, अधिक प्रदेशावर ताबा, या गोष्टींकडे लक्ष केंद्रीभूत केले. दुसऱ्या महायुद्धानंतर या संघटनेचा आणि सुसज्जतेचा त्यांनी फायदा घेतला. १९४७ साली च्यांग-कैशेकची कमकुवत व भ्रष्ट राजवट उलथून पाडून त्यांनी चिनी कम्युनिस्ट क्रांती घडवून आणली ( १९४९ ). पण या क्रांतीच्या यशात रशियाच्या लाल सैन्याची मदत आणि शस्त्रसामुग्रीचा पुरवठा हाच प्रमुख व निर्णायक घटक होता हे नमूद करणे जरूर आहे.

क्रांतीनंतर कम्युनिस्ट राजवटीने क्रांतीचा कार्यक्रम अमलात आणावयास सुरुवात केली. राजकीय व आर्थिक सत्ता दृढमूल करणे हा प्रारंभीचा कार्यक्रम. त्याकरिता सत्तेचे केंद्रीकरण, पक्षसंघटनेचा विस्तार, राज्याचे पोलिसीकरण, राष्ट्राचे लष्करीकरण, जनतेच्या जीवनाचे बराकीकरण ( Regimentation ) समाजरचना बदलण्याकरिता नवीन कायदे, वगैरे उपायांचा अवलंब करण्यात आला. श्री. केणी यांनी यापुढील कार्यक्रम एका परिच्छेदात साररूपाने मांडला आहे.

१९५३ साली पहिल्या पंचवार्षिक योजनेस सुरुवात झाली. औद्योगीकरणाच्या दिशेने उचललेले हे पाऊल होते. कृषिविषयक क्षेत्रात शेतीचे सामुदायीकरण व कम्यूनसची ( Communes ) प्रस्थापना यांची नांदी म्हणून परस्पर साहाय्यकारी संघ ( Mutual Aid Societies ) संघटित करण्यात आले. जनतेच्या खासगी जीवनावर हेरगिरी करण्याचा बंदोबस्त करण्यात आला. धान्यविक्री व अन्नवाटप यांवर सरकारी मक्तेदारी सुरू करण्यात आली. राष्ट्रीय जनता काँग्रेसने नवीन राज्यघटना स्वीकृत करून घेतली. १९५४ साली पंचशील तत्व आंतर्भूत असलेल्या चीन-भारत तहावर सह्या झाल्या. १९५५ साली पुढे बांडगूळ ठरलेली












बांडुंग परिषद. १९५६ साली बुद्धिवाद्यांना थोडे अधिक स्वातंत्र्य देण्याचे दृष्टीने माओने जाहीर केलेली 'शतपुष्पें बहरूं देत' ही घोषणा. आणि १९५८ साली, "प्रगतीची प्रचंड झेप" (Great Leap Forward) म्हणून दुसऱ्या पंचवार्षिक योजनेस सुरवात!

चीनला कम्युनिस्ट 'नंदनवनाप्रत' नेणाऱ्या या क्रांतिकारक कार्यक्रमाची अंमलबजावणी करताना मार्क्सवादी इतिहासवादाच्या (Historicism) साच्यात काही गोष्टी बसाव्यात म्हणून ऐतिहासिक सत्याला मन मानेल तशी मुरड घालण्यात आली. जनतेला अनन्वित हालअपेष्टा सोसाव्या लागल्या. जुलुमाचे बाबतीत चेंगिझखान देखील आपल्या थडग्यात शरमिंदा झाला असेल! आर्थिक जीवनाचे सामुदायीकरण, बौद्धिक जीवनाचे बराकीकरण, राष्ट्राचे लष्करीकरण, करण्यात आले. वर्गविहीन समाजाऐवजी राज्यकर्त्यांचा आणि पक्षसंघटनेचा एक नवीन वर्ग निर्माण झाला. शेवटी साम्यवादी स्वर्गाच्या दिशेने वाटचाल करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या कम्युनिस्ट राजवटीने चिनी राष्ट्राचा एक प्रचंड तुरुंग बनवून टाकला. या विधानाची सत्यता पटवून घ्यावयाची असेल तर श्री. किणी यानी उद्धृत केलेले कम्यून्समधील भयंकर जीवनाचे वर्णन वाचावे. किंवा साचेबंद मेंदू (automatons) तयार करण्याचे कार्य तडीस गेल्यानंतर माओने 'शतपुष्पें बहरुं देत' म्हणून बुद्धिजीवी वर्गास थोडे स्वातंत्र्य दिले; परिणामी कम्युनिस्ट राजवटीवर निराशा वा नापसंति व्यक्त करणाऱ्या विदारक टीकेचा वर्षाव झाला. या टीकेचे काही मासले श्री. किणी यांनी उद्धृत केले आहेत.

कामगार वर्ग (Proletariat) हा मार्क्सच्या इतिहासवादातील आर्थिक ईश्वराचा प्रेषित! पण चीनच्या कम्युनिस्ट नंदनवनात बिचाऱ्याला हलाखीचे नि कष्टाचे जीवन जगावे लागत आहे. कारखान्यातील यंत्रांचा एक भाग हीच त्याची भूमिका! १२ ते १४ तास काम करा आणि उत्पादन वाढवा, ही राज्यकर्त्यांची घोषणा. कम्युनिस्ट 'नंदनवनात' आराम हराम है! (मार्क्सच्या मते: Real riches for workers is not the riches of money but of leisure and creation) सतत, एका दमात चोवीस ते तीस तास काम कोण करतो याची कामगार–कामगारात स्पर्धा लागून राहिलेली असते. आणि एवढे करून हे कामगार बोनस, सुट्टीचा पगार, संघटना–स्वातंत्र्य व संप यावरील आपला हक्क आपखुषीने (?) गमवावयास तयार असतात! राष्ट्राकरिता, पृथ्वीतलावर स्वर्ग निर्माण व्हावा म्हणून केवढा स्वार्थत्याग !!

कम्युनिस्ट चीनमधील आर्थिक उत्पादन–प्रगतीच्या इमल्याची भव्यता आकडेबाजीने (Statistics) सुशोभित केलेल्या खिडक्यांमुळे नेत्रदीपक वाटते. पाश्चात्यांना जी प्रगति साधण्यास १०० वर्षे लागली ती आम्ही एका दिवसात साधू, या महत्त्वाकांक्षेने माओने टाकलेली Great Leap Forward अखेर Leap Backward ठरली!

शेवटी माओने उभारलेल्या तुरुंगाचे मार्मिक वर्णन करताना श्री. किणी लिहितात: "Ant-hill and bee-hive have perfect order. But what is the use in winning the whole world, if we lose our soul ...... freedom ... in the process?"

### चीन–भारत संबंध

तिसरा निबंध श्री. बी. के. देसाई यांनी लिहिला आहे. 'चीन-भारत संबंध' हे या निबंधाचे शीर्षक. पण हा संबंध शोधूनही सापडत नाही! राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, संपर्काच्या दृष्टीने या दोन राष्ट्रातील जनता शतकानुशतके एकमेकापासून दूर अंधारातच राहिली. श्री. देसाई लिहितात: भारत व चीन यांचा प्रथम जो संबंध आला तो बुद्धधर्माचे भारतातून चीनमध्ये पदार्पण आणि नंतर प्रसार झाला त्यावेळी. पुढे बुद्धधर्म चीनमधून जवळजवळ लोप पावला. तदनंतर, १० व्या शतकापासून तो १९ व्या शतकाच्या प्रारंभापर्यंत दोन्ही राष्ट्राचा प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संबंधच नव्हता. १९ व्या शतकात भारतीय जनतेचा नव्हे, तर ब्रिटिश राज्यकर्त्यांचा चीनशी जो संबंध आला तो हिंदुस्थान-चीन सीमा संरक्षण व व्यापार याबाबत! हा संबंध मैत्रीचा नसून संघर्षाचा होता. स्वातंत्र्यपूर्व काळात हिंदी राष्ट्रीय काँग्रेस आणि तिचे राजकीय पुढारी व चीनमध्ये K.M.T. आणि तिचा








नेता च्यँाग-कै-शेक यांच्यात जे मित्रत्वाचे संबंध आले ते साम्राज्यशाही विरोधाच्या समान भूमिकेमुळे स्वातंत्र्योत्तर काळात समाजवादी नेहरूंना, तसेच बुद्धिजीवी मध्यमवर्गाला, साम्यवादी चीनबद्दल वाटणारे आकर्षण यांच्या द्वारे चीन-भारत मैत्रीचे संबंध दृढ असल्याचा भ्रम निर्माण करण्यात आला. याच सुमारास ' हिंदी-चिनी भाई भाई ' चा भावनातिरेक शिगेला पोहोचला होता; घोषणा उच्च रवाने केल्या जात होत्या. आणि शेवटी चिनी आक्रमणामुळे भ्रमाचा भोपळा फुटला ! भारत-चीन संबंधाचे हे थोडक्यात सार आहे !!

## काही शंका

या प्रकरणाचे परीक्षण करताना त्यात निवेदन केलेल्या काही घटना वाचून पुढील काही महत्त्वाचे प्रश्न व शंका डोळ्यासमोर उभ्या राहतातः-

( १ ) चिनी-भारतीय मित्रत्वाचे संबंध शतकानुशतके अस्तित्वात नसता ते तसे असल्याचा भ्रम निर्माण करून जनतेची वंचना कशाकरिता ? ( २ ) स्वातंत्र्याच्या व स्वयंनिर्णयाच्या हक्कांची तळमळ बाळगणाऱ्या आपल्या राज्यकर्त्यांनी तिबेटचा बळी देण्यात सहभागी का व्हावे ? ( ३ ) भारतीय स्वातंत्र्याबद्दल आदर न बाळगणाऱ्या, मित्रत्वाचा हात तुच्छतेने झिडकारणाऱ्या, भारतीय कम्युनिस्ट पक्षच भारताला साम्राज्यशाही व तिचे हस्तक ( नेहरू ) यांच्या दास्यशृंखलेतून मुक्त करील असा विश्वास व्यक्त करणारा संदेश रणदिव्यांना पाठविणाऱ्या, माओवर शांततेचा व पंचशीलाचा पाईक म्हणून आमच्या राज्यकर्त्यांनी विश्वास का ठेवला ? ( ४ ) चीन आक्रमणाची तयारी करीत आहे असे विश्वसनीय इशारे वारंवार मिळत असताही आमचे नेहरू-मेनन सरकार बेफिकीर का राहिले ? ( ५ ) १९५३ साली ' हिंदी-चिनी भाई-भाई ' तमाशा सुरू झाला. १९५५ साली ही मोहीम शिगेला पोहोचली. भारतातून शिक्षणक्षेत्रातले आचार्य, प्राचार्य, कलाक्षेत्रातील फिल्मी, गायक, वगैरे कलावंत, कामगारसंघांचे प्रतिनिधी, सरकारी मंत्री, वृत्तपत्रकार, विचारवंत (?) सारी विद्वान मंडळी या ना त्या नात्याने कम्युनिस्ट पंढरीची वारी करून परत आली. आणि काही अपवाद वगळल्यास यापैकी बहुतेकांनी माओच्या तुरुंगाची तोंड भरून स्तुति केली. याला काय म्हणायचे ? बुद्धिदारिद्य, की आत्मवंचना, का स्वप्नरंजन ? ( ६ ) या परीक्षणातील सर्वात महत्त्वाचा व मूलगामी प्रश्न असा की दुसऱ्या महायुद्धानंतर बुद्धिवादावर आधारलेल्या युरोपीय संस्कृतीशी संपर्क येताच रशियन कम्युनिझमचे स्पष्ट झालेले स्वातंत्र्य व लोकशाहीविरोधी स्वरूप; स्तालिनच्या हुकुमशाहीचे कुश्चवने नंगे केलेले क्रूर स्वरूप; हंगेरीचे हत्याकांड; भांडवलशाही पूर्णावस्थेस पोहोचलेल्या पाश्चात्य जगात राजकीय, आर्थिक व वैचारिकदृष्ट्या कम्युनिझमला मिळालेले अपयश; महायुद्धात बेचिराख झालेल्या जर्मनी, जपान, इटली, वगैरे राष्ट्रांची कम्युनिझमच्या मृगजलामागे न धावता झालेली सर्वांगीण प्रगति व पुनरुत्थापन, आणि मार्क्सवादाचे भंग पावलेले स्वप्न; पूर्वी मार्क्सवादावर श्रद्धा असलेल्या रसेल, सिडने हूक, कोअेस्लर, एरिक फ्रॉम, सार्त्र, कॅमू, मानवेंद्र रॉय, इत्यादि अनेक जागतिक कीर्तीच्या विचारवंतांच्या या श्रद्धेस पडलेले तडे; त्यांच्या अनुभवास आलेले मार्क्सवादांतील दोष, आणि मार्क्सवादाच्या पलीकडे जाण्याची त्यांना पटलेली आवश्यकता; पाश्चात्य जगात हे वैचारिक व राजकीय फेरबदल होत असता इकडे आशिया खंडात चीनसारख्या मागासलेल्या राष्ट्रात कम्युनिस्ट क्रांति होऊन क्रांतीचे फळ म्हणून माओने चीनचा एक भयंकर तुरुंग बनविला, आणि भारतात मात्र ३०-३५ वर्षांपूर्वी कायदेभंगाच्या चळवळीमुळे तुरुंगात असताना तेथे पठण केलेल्या समाजवादाच्या पोथ्या अजूनही उराशी बाळगून भिन्नभिन्न भारतीय समाजवादी पक्ष समाजवादी समाजरचनेची, गांधीवादी समाजवादाची, प्रजासमाजवादाची, भगव्या समाजवादाची आणि शेवटी लाल समाजवादाची, जपमाळ ओढीत बसलेले दिसतात! नेहरूंना समाजवाद्यांशिवाय इतर कोणीही कॉंग्रेसमध्ये नको! मोरारजी गांधीवादी मार्गाने समाजवाद स्थापायला निघाले आहेत ! याशिवाय प्र. सो. पा. वाले, लोहियागटवाले, आणि जनसंघ सारेच समाजवादी ! बरेचसे मार्क्सवादाच्या अभ्यासाचा गंधही नसता, मोर नाचतो म्हणून लांडोर नाचते, या न्यायाने समाजवादी आहेत. खुद्द मार्क्स आज जर जिवंत असता तर तोही समाजवादी राहिला








नसता ! कारण तो मार्क्सवादी नव्हता आणि लेनिनवादी तर नव्हताच नव्हता !

चिनी आक्रमणाला यशस्वीपणे तोंड देण्याकरिता भारताची जी वैचारिक तयारी व वैचारिक सुस्पष्टता हवी त्या दृष्टीने वर उपस्थित केलेले प्रश्न महत्त्वाचेच नव्हे तर जिव्हाळ्याचे आहेत. श्री. व. भ. कर्णिक यानी पाचव्या निबंधात चिनी आक्रमणाचे हेतू, माघारीचा अन्वयार्थ, आक्रमण परतवून लावण्याकरिता संरक्षणाची तयारी व गरजा या प्रश्नांची चर्चा केली आहे. या चर्चेशी वरील प्रश्न व शंका संलग्न आहेत.

## सीमाप्रश्न

श्री. इंदु पटेल यांनी लिहिलेला ' सीमा प्रश्न ' हा चवथा निबंध. हे प्रकरण सीमाप्रश्नावर भारत व चीन सरकारांनी परस्परांशी केलेल्या पत्रव्यवहारानेच भरलेले आहे. हा पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला असल्या कारणाने सर्वांना सुपरिचित आहे. पत्रव्यवहार शुद्ध काथ्याकूट आहे. त्यात नेहरूंची भूमिका शोकरसात्मक वाटते. चौ- एन्- लायची भूमिका ताठर व आडमुठेपणाची. सीमा प्रश्न असा प्रश्नच नव्हता. आणि चीनला सद्हेतुपूर्वक तो सोडवायचा असता तर तो सुटला असता. पण ' तू नाही तुझ्या बापाने ' अशी लांडगा व कोकरू या गोष्टींतल्याप्रमाणे चीनची भूमिका होती. अंतरीचा कुटिल हेतु दुसराच असल्यामुळे चीनने हा प्रश्न बळेच निर्माण केला. आक्रमणानंतर कम्युनिस्ट चीनच्या या कुटिल हेतूची जाणीव समाजवादी भारताला झाली हा काय कमी फायदा ? शतकानुशतके अभेद्य गणली गेलेली हिमालयाची नैसर्गिक तटबंदी, आमची उत्तुंग उत्तरसीमा, चिन्यांनी अखेर भंगून टाकली ! ही दुर्दैवी घटना श्री. पटेल यानी नाट्यपूर्ण वर्णिली आहे. आमच्या हिमालयाचे त्यानी रेखाटलेले भौगोलिक शब्दचित्र लालित्यपूर्ण आहे.

कम्युनिस्ट चीनने आमच्या हिमालयाची अभेद्य तटबंदी अखेर अनेक ठिकाणी भेदून २० ऑक्टोबर १९६२ रोजी भारतावर आक्रमण केले, या घटनेचा इतिहास अगदी ताजा व सर्वांच्या परिचयाचा आहे. पुस्तकाच्या शेवटल्या निबंधात श्री व. भ. कर्णिक यानी तो निवेदन केला आहे. भारताचा युगायुगाचा इतिहास परदेशीयांच्या स्वाऱ्या व आक्रमणे यानी भरलेला आहे. एकछत्री अमलाखाली अगदी प्रथम स्वतंत्र झालेल्या भारतावर पुनश्च चिन्यांची टोळधाड आली आणि मागे परतली हे आक्रमण आगळेच आहे. आक्रमणानंतर चीनने घेतलेली माघार आणि माघारीनंतर पुढे काय हा भारतापुढे उभा ठाकलेला प्रश्न, यांची चर्चा हा या निबंधाचा उल्लेखनीय भाग आहे. श्री. कर्णिकांची ही चर्चा उद्बोधक झाली आहे.

## चीन माघारी का फिरला ?

विजयामागून विजय मिळत असता चीनने माघार का घेतली ? कुणी म्हणतात चीनला पाहिजे होता तेवढा सीमाप्रदेश मिळाला म्हणून. कुणी म्हणतात चीनला आपल्या सामर्थ्याचे प्रदर्शन व भारताच्या दुबळेपणाची नाचक्की करावयाची होती म्हणून. याबाबत क्रुश्चेवची कारणमीमांसा श्री. कर्णिकांनी उद्धृत केली आहे, ती थोडक्यात अशी : ब्रिटिश व अमेरिकन साम्राज्यवाद्यांकडून भारताला भरीव लष्करी मदत मिळू लागल्याबरोबर चीनला शहाणपणा सुचला आणि कळून आले की या संघर्षाचे महायुद्धात रूपांतर होईल. याचा फायदा साम्राज्यशाहीच घेईल. इंग्लंड अमेरिकेजवळ जादा शस्त्रास्त्रे झाली आहेत. महायुद्ध होऊन त्यात भारतीय व चिनी जनतेचा जीव गेला तर या राष्ट्रांना त्याचे काय ? ही मीमांसा थोडी प्रचारकी थाटाची व संभावितपणाची असली तरी एका अर्थी थोडी खरीहीपण आहे. क्रुश्चेवने युरोपमधला आपला अनुभव कदाचित् बोलून दाखविला असेल. कारण तेथे वैचारिक विरोधाबरोबरच शस्त्रसज्जतेमुळेही कम्युनिझमची टोळधाड थोपविली गेली. पण माघारीचे कारण शोधताना, भाई क्रुश्चेवच्या मताला मान देऊनही भाई माओ त्सेतुंग यांच्या पुढील वचनाकडे दुर्लक्ष करून भागणार नाही : " When the enemy comes forward, I withdraw; When the enemy withdraw, I go forward When the enemy settles down, I disturb him. When the enemy is exhausted, I fight with him. "

## लाल साम्राज्यवाद

कम्युनिस्ट चीनचे हेतू काय आहेत हे आतातरी स्पष्ट झालेले आहे. कुणी म्हणतात की आक्रमक

साम्राज्यवाद हा चीनच्या इतिहासात व रक्तातच आहे. पण कम्युनिस्ट चीनचा हा आधुनिक आक्रमक साम्राज्यवाद सरंजामशाहीतील सम्राटांचा आक्रमक साम्राज्यविस्तार नव्हे की भांडवलशाहीची उन्नतावस्था जी साम्राज्यशाही ( Imperialism ) तीही नव्हे. हा नवीन लाल साम्राज्यवाद.

चिनी आक्रमणाच्या हेतूंचे अचूक निदान करणाऱ्या श्री. मानवेंद्र रॉय यांच्या एका लेखातील मौलिक उतारा श्री. कर्णिक यांनी उद्धृत केला आहे. " Having failed in Europe, communism is now poised for the conquest of Asia and later Africa." आशिया खंडात भारत हाच एक देश कम्युनिझमविरोधी बालेकिल्ला होऊ शकेल. शिवाय, लोकशाही मार्गाने आपली आर्थिक प्रगति करून घेण्याचा मार्ग भारताने अवलंबिला आहे. ही प्रगति साध्य होऊन भारत सामर्थ्यवान बनल्यास युरोपात रशियाच्या वाट्याला जो अनुभव आला तो आशियात आपल्या वाट्याला येईल आणि जागतिक कम्युनिस्ट क्रांतीचे स्वप्न विरेल ही भीती चीनला वाटत आहे. म्हणून युरोपमध्ये किंकर्तव्यमूढ झालेल्या क्रुश्चेवला, तो जागतिक कम्युनिस्ट क्रांतीच्या ध्येयाशी निमकहराम ठरला म्हणून, चीन शिव्या घालीत आहे. 'युरोप-अमेरिकेतील कम्युनिस्ट क्रांतीचा मार्ग यांगत्सी-गंगा नद्यांच्या काठावरून गेलेला आहे '–लेनिनचे हे सुप्रसिद्ध वचन आहे. अर्थात् लेनिनवादाशी प्रामाणिक माओच आहे आणि प्रतारणा करणारा क्रुश्चेव आहे. माओचा बंदुकीच्या नळीचा ( Gun Barrel theory ) सिद्धान्त आणि लेनिनची क्रांतीची साध्यसाधन-मीमांसा यांत पूर्ण साम्य आहे. अतएव रशियात स्तालिनची परंपरा अजून लोप पावली नसल्याकारणाने क्रुश्चेव कदाचित् इतिहासवादाच्या रथाखाली ढोळाप्रमाणे चिरडला जाईलही ! कदाचित् श्री. मानवेंद्र रॉय यांच्या एका काळच्या आशावादानुसार, " He might regain its humanist soul under the influence of the rationalist and democratic culture of the West. Roman barbarians conquered Greece; but the vanquished civilised the conqueror." एकंदरीत, चीनच्या दृष्टीने हा कम्युनिस्ट तत्वज्ञानाच्या जीवन-मरणाचा प्रश्न आहे.

### वैचारिक विरोध आणि शस्त्रसज्जता

मानवी स्वातंत्र्यविरोधी समुदायवादी विचारसरणी म्हणून कम्युनिझमविरोधी लढ्यात जगातील सुज्ञ व स्वातंत्र्यप्रेमी जनता वैचारिक विरोध व शस्त्रसज्जता या दोहोंच्या भरभक्कम पायावर खंबीरपणे उभी राहिली आहे. भारत या लढ्यात सहभागी होणार आहे काय ? चिनी आक्रमणाला परिणामकारक विरोध करावयाचा असेल तर भारताचा हाच दृष्टिकोन हवा. कम्युनिझमला वैचारिक विरोध करण्याचे बाबतीत हा गट का तो गट ( Non-Allignment ) हा प्रश्नच उद्भवू शकत नाही. चिनी आक्रमणाचा कम्युनिझमशी काही संबंध नाही, ही नेहरूंची समजूत म्हणजे शुद्ध वैचारिक गोंधळ आहे. या ' समाजवादी ' वैचारिक गोंधळातून भारताला बाहेर पडावयास हवे. त्याचबरोबर शस्त्रसज्जताही हवी. आणि अण्वस्त्रांच्या या युगात शस्त्रसज्जतेच्या मर्यादाही ओळखायला हव्यात. नाहीतर शुद्ध वैचारिक भूमिकेविना लष्करशाही निर्माण व्हावयाची ! श्री. कर्णिक या चीनविरोधी युद्धास ' जनता युद्ध ' ( People's War ) म्हणतात. कारण हे युद्ध म्हणजे भारतीय जनतेला एक आव्हान तशीच एक संधीही पण आहे. यामुळे ऐक्यभावना व कार्यक्षमतेतील जोम व उत्साह वाढणार आहे. शस्त्रसज्जता व आर्थिक नियोजन या दोहोंचीही आता भारताला सांगड घालावी लागणार आहे. प्रश्न बिकट आहे. पण तो सुटला तर भारत त्यातून तावून सुलाखून निघेल.

### मानवेंद्रांचे द्रष्टेपण

परिशिष्ट म्हणून पुस्तकास जोडलेला श्री. मानवेंद्र रॉय यांचा 'Communism In Asia' हा लेख या ग्रंथाचे भूषण आहे. चिनी आक्रमण होण्याच्या आधी काही वर्षापूर्वी लिहिलेल्या या लेखात त्यांनी आपल्या अनन्यसाधारण द्रष्टेपणाने चिनी आक्रमणाची पार्श्वभूमि व पुरोभूमि यांचे दर्शन घडविले आहे. रॉय हे मार्क्सवादाचे उच्च श्रेणीतील गाढ व्यासंगी. ते पोथीनिष्ठ मार्क्सवादी कधीच नव्हते. मूर्तिभंजकता व बुद्धिवाद हा त्यांचा वैचारिक पिंड. म्हणूनच








दुसऱ्या महायुद्धानंतर कम्युनिझमच्या मर्यादा लक्षात येताच मार्क्सवादातील दोष हेरून त्यातील मानवतावादी व मुक्तस्वातंत्र्याचा वारसा ( Humanist & Libertarian heritage ) घेऊन ते मार्क्सवादाच्या पलीकडे ( Beyond Marxism ) गेले. युरोपमध्ये कम्युनिझमला अपयश का आले याची त्यांनी लेखाच्या सुरुवातीस ( परिच्छेद २, ३, ४ ) केलेली मीमांसा उत्कृष्ट आहे. आशिया खंडातील मागासलेल्या, अपरिपक्व, देशात कम्युनिझमचे बीज का रुजले, तेथील सुशिक्षित मध्यमवर्गाला कम्युनिझम विषयी सहानुभूति व आकर्षण का वाटते, येथे फोफावणाऱ्या कम्युनिझमचे स्वरूप काय, आणि त्याचा धोका काय, वगैरे प्रश्नांची श्री. रॉयनी या लेखात केलेली मूलगामी चर्चा उद्बोधक आहे. आशियातील कम्युनिझमचे स्वरूप लाल रंग दिलेल्या राष्ट्रवादाचे ( Nationalism painted red ) आहे. यामुळेच तो भारतातील व पाकिस्तानातील राज्यकर्त्यांत चंचुप्रवेश करून दबा धरून बसलेला आहे. अन्वयार्थाने भारतातील समाजवाद भगवा आहे, पाकिस्तानात तो हिरवा आहे. केवळ लष्करी बळावर कम्युनिझमला प्रतिकार करता येणार नाही असा इशारा देऊन प्रतिकार करण्याकरिता काय केले पाहिजे या प्रश्नाची चर्चा त्यांनी लेखाच्या शेवटी केली आहे ( शेवटले दोन परिच्छेद ) श्री. रॉय म्हणतात, "Democracy must regain its humanist soul and revert to the faith in the sovereignty of the individual, and economic thought and practice must be radically reoriented. Otherwise, the challenge of Communism cannot be met anywhere."*

* [ '*China Invades India*,' Edited by V. B. Karnik. Allied Publishers Private Limited, Bombay, New Delhi, Calcutta, Madras, London, New York. Price Rs. 15=50 ].

श्री. रा. टिकेकर

# डॉ. सुरेंद्रनाथ सेन

ता. ३० ऑक्टोबर रोजी डॉ. सुरेंद्रनाथ सेन यांचा मृत्यू झाल्यास एक वर्ष झाले. ते जिवंत आहेत. "कसं काय? ठीक आहे ना? आमचे पेशवे काय म्हणतात?" अशी चौकशी मराठी पद्धतीने करतात- त्यांचे शब्द कानात घुमतात- त्यांची मूर्ति समोर दिसते- ते परलोकवासी झाले हे खरे वाटत नाही.- इतका त्यांचा महाराष्ट्राचा निकटचा संबंध होता. मराठ्यांच्या इतिहासाबाबत त्यांचे संशोधन आणि त्यांचे निवेदन श्रेष्ठ दर्जाचे होते. इतर कुणीही न केलेले कार्य त्यांनी पार पाडले.

## मराठ्यांच्या इतिहासाचा बंगालमध्ये अभ्यास

आम्हा मराठ्यांचा इतिहास बंगाली विद्वानांनी अभ्यासावा –असा काही तरी पूर्वसंकेत दिसतो. डॉ. रमेशचंद्र दत्त. मेजर बसू, सर जदुनाथ सरकार, डॉ. सुरेंद्रनाथ सेन, डॉ. ए. सी. बानर्जी, डॉ. प्रतुलचंद्र गुप्ता...अशी नावे किती म्हणून घ्यावी? वास्तविक बंगाली विद्वानांना मराठी इतिहासाचा अभ्यास करावासा वाटतो हीच मुळी त्या इतिहासाच्या महत्त्वाची खूण होय. त्यातल्या त्यात सुरेंद्रनाथांनी केला तसा अभ्यास इतर कुणीही केला नाही. कारण सुरेंद्रनाथांचा पिंड राष्ट्रीय चळवळीत तयार झाला होता. परकीयांनी आमची बदनामी करावी हे त्याना सहन झाले नाही. त्यांचा विकृत इतिहास खोटा ठरविण्यासाठी सुरेंद्रनाथ इतिहासकार झाले असे म्हणता येते. पण त्यांनी बदनामी वाचली ती मराठ्यांची होती– मराठे लुटारू होते; पुंड होते; त्याना राज्य करता येत नव्हते- इत्यादि आरोप वाचून सुरेंद्रनाथांना राग आला. "आमचे मराठे असे करणार नाहीत" अशी खात्री त्याना वाटली आणि खरा इतिहास होता तरी कसा, हे अभ्यासण्याच्या ईर्ष्येने ते तपास करू लागले. "मराठ्यांची शासन पद्धति" (ॲडमिनिस्ट्रेटिव्ह सिस्टिम ऑफ दि मराठाज्) ह्या त्यांच्या अभ्यासपूर्ण ग्रंथाचे प्रयोजन असे राष्ट्रीय होते.

## राष्ट्रीय वृत्तीची जोपासना

पण मराठ्यांबद्दल त्यांना आत्मीयता का वाटली? आणि सर जदुनाथांनी मोगल बादशाहीचा अभ्यास पत्करला तसा न पत्करता सुरेंद्रनाथ मराठ्यांच्या इतिहासाकडे का वळले? त्यांच्या जीवनक्रमातल्या काही घटनांमुळे त्यांची राष्ट्रीय वृत्ती वाढीस लागली, त्या राष्ट्रीय वृत्तीमुळेच त्यांना मराठी इतिहासात गोडी वाटू लागली.

पूर्वबंगालातल्या ( पाकिस्तान ) बारिसाल जिल्हात माहिलाडा गावी सुरेंद्रनाथांचा जन्म ता. २९ जुलै १८९० रोजी झाला. वडिलांचे नांव मथुरादास. जवळच एका जमीनदाराकडे त्यांची नोकरी. एक दोन वर्षे बाल्यावस्थेची ढांगाईल येथे गेली. शिक्षणाची सुरुवात अन्यत्र झाल्यावर श्री. अश्विनी कुमार दत्त यांच्या शाळेत ते शिकू लागले. राष्ट्रीय वृत्तीची ही शाळा. तीत मॅट्रिक होईपर्यंत सुरेंद्रनाथ राहिले. रमेशचंद्र दत्त यांची कादंबरी "महाराष्ट्र जीवन-प्रभात" वाचल्यामुळे आमच्या "शिवबा" ने त्यांना पूर्णपणे मोहून टाकले! रजनीकांत गुप्त यांच्या "आर्यकीर्ति" पुस्तकाने ते भारावून गेले. इतिहासाची त्यांची ओढ बाळपणापासून होती. टॉडच्या राजस्थानचा बंगाली अनुवादही त्याना मिळाला, तो त्यानी आधाशीपणाने वाचला.

पण सुरेंद्रनाथ कॉलेजमध्ये जातील की नाही याबद्दल निश्चिती नव्हती. स. १९०५ मध्ये मॅट्रिक पास झाल्यानंतर लगेच ते कॉलेजमध्ये गेले नाहीत. मॅट्रिक परीक्षेत त्यांचा निकाल देखील साधारण होता. चमक कुठेच नव्हती. काय करावे या विचारात दोन तीन वर्षे गेली. काही दिवस त्यानी मास्तरकी पत्करली. कॉलेज –शाळा–अध्ययन–अध्यापन असे करीत करीत सुरद्रनाथांनी बी. ए. पदवी मिळविली ( स. १९१३ ). ढाका येथील त्यांच्या अभ्यासाची दोन वर्षे महत्वाची ठरली.








## दोन गुरूंचा संस्कार

साधारण मॅट्रिक झालेल्या ह्या सुरेंद्रनाथावर प्रेमळपणे संस्कार करणारे दोन तीन थोर गुरु लाभले. अश्विनीकुमार दत्तांनी त्याला धीर दिला. राष्ट्रीय वृत्तीचा त्याचा स्फुल्लिंग फुंकर घालून त्यानी अधिक प्रज्ज्वलित केला. सुरेंद्रनाथावर ( पदवीधर होण्यापूर्वी ) अश्विनीकुमारांनी एक कामगिरी सोपविली. इटलीच्या स्वातंत्र्य संग्रामाचा अभ्यास करून त्यासंबंधी बंगाली पुस्तक सुरेंद्रनाथांनी लिहावे, अशी त्यांची योजना होती. त्या वेळी इटलीतील राष्ट्रीय चळवळीकडे सर्वच भारतीय नेत्यांचे लक्ष होते. " इटलीचे रामदास " म्हणून काव्हूरचा परिचय महाराष्ट्रात झालाच होता.

नव जवानांना प्रचोदित, प्रोत्साहित, करण्याचे महत्त्वाचे कार्य आपण होऊन करणारी थोर माणसे सुरेंद्रनाथांच्या वेळी होती. त्यांनी आपणावर किती उपकार करून ठेवले याची कृतज्ञतापूर्वक आठवण सुरेंद्रनाथ मधून मधून सांगत. ढाका कॉलेजात ( स. १९११–१३ ) असताना प्रो. रॅम्सबोथम यांनी आपणास उत्तेजन दिले, योग्य वाटेला लावले, असेही सेन वारंवार म्हणत.

मॅट्रिक ते बी. ए., एम्. ए. पर्यंत ( १९०५–१९१५ ) दहा वर्षात सेन यांचे इतिहासप्रेम इतके वाढले, त्यांचा अभ्यास असा पक्का झाला, की पारंगत परीक्षेत कलकत्ता विद्यापीठात ते दुसरे आले !! आणि इतक्या खटपटीनंतर मनाजोगे काम मिळाले नाही म्हणून एका 'धनिक बाळा' चे पालक-शिक्षक म्हणून ढाक्यास त्यांनी नोकरी पत्करली ! (स. १९१५)

## महाराष्ट्राची ओळख

पुढल्या वर्षीच सेन यांना महाराष्ट्रात येण्याची, मराठी समाजाशी ओळख करून घेण्याची, संधी लाभली. जबलपूरच्या सरकारी कॉलेजात इंग्रजी व इतिहास शिकविण्यासाठी त्यांची निवड झाली. तेथे महाराष्ट्रीयांशी संबंध येताच सेन मराठी शिकू लागले. त्या मराठी अभ्यासाचे फळ म्हणजे "सभासद बखरी"चा इंग्रजी अनुवाद: " शिव छत्रपति ". ही शिवसेवा फलद्रूप ठरली. सेन यास कलकत्ता विद्यापीठात पाचारण आले. बहुमानाची-इतिहास प्राध्यापकाची-जागा त्यास मिळाली. मराठी इतिहासाची पुस्तके पुण्याहून मागविण्याची व्यवस्था झाली. फर्ग्यूसन कॉलेजमधील इतिहासाचे प्रा. हरिभाऊ लिमये यांनी कलकत्ता विद्यापीठासाठी पुस्तके निवडली. त्यांचा उपयोग केला सुरेंद्रनाथांनी.

प्रेमचंद रॉयचंद स्कॉलर्शिप म्हणजे कलकत्त्यातील विद्वानांची पारख करण्याचे साधन. तिची परीक्षा मोठी कडक. पण ऐन उमेदीतच अशा कडक परीक्षा उत्तीर्ण होण्याचा उत्साह वाटतो. सुरेंद्रनाथांनी ती परीक्षा दिली. त्यांना कलकत्ता विद्यापीठातील विद्वानांचा तो बहुमान मिळाला. पी. आर्. एस्. ( P. R. S. ) = प्रेमचंद रायचंद स्कालर = अशी तीन अक्षरे त्यांच्या नावानंतर झळकू लागली. ( स. १९१७ ) एवढ्याने प्राध्यापक संतुष्ट नसतात. पी. एच्डी. उपाधीची जरूरी त्यांना भासते. स्कॉलर्शिपसाठी त्यानी " पेशव्यांची राज्यपद्धति " हा प्रबंध लिहिला. तर डॉक्टोरेटसाठी " मराठी राज्याची शासनव्यवस्था " असा अधिक व्यापक विषय पत्करला. त्याना ही प्राध्यापकीय पी. एच् डी. ची पदवी स. १९२२ मध्ये मिळाली. स. १९०५ मध्ये मॅट्रिक झालेल्या विद्यार्थ्याचा हा विद्यापीठातला विकास १६–१७ वर्षांनी पुरा झाला !!

## कलकत्त्याहून दिल्लीत

मात्र ह्या इतिहासप्रेमी विद्यार्थ्याचे कार्यक्षेत्र नुसते कलकत्त्यापुरते मर्यादित रहावयाचे नव्हते. सुमारे २२–२३ वर्षे कलकत्ता विद्यापीठात इतिहासाचे प्राध्यापक म्हणून छान भरघोस कामगिरी केल्यावर राजधानीत त्याना पाचारण केले. " राष्ट्रीय दप्तरखाना " ( इंपीरियल रेकॉर्डस् ) म्हणून पूर्वीचे कलकत्त्याचे ऑफिस दिल्लीस गेले होते. त्याचे प्रमुखपद सेनांकडे चालत आले. सेन कलकत्ता सोडून दिल्ली निवासी बनले. ( स. १९३९ ).

देशातले अत्यंत व्यापक दप्तर संभाळून सुरेंद्रनाथांनी अनेकांना संशोधन कार्यात गोवले. अनेक भाषातील कागदपत्र दिल्लीच्या दप्तरखान्यात होते. ते ते त्या त्या पंडितांच्या हवाली करून छापून काढण्याची कामगिरी त्या त्या पंडितांवर सोपविली. कामगिरीबद्दल काही फूल नाही फुलाची पाकळी म्हणून द्रव्यही दिले. ( मराठी कागदपत्र मात्र अद्याप छापून झाले नाहीत.








त्याचे काय झाले, त्याचेच संशोधन करण्याचा प्रसंग ओढवला आहे. )

दहा वर्षात दिल्लीच्या दप्तरखान्याचा कायापालट सुरेंद्रनाथांनी घडवून आणला. अभ्यासकांना किती तरी सोई त्यानी करून दिल्या. दप्तराची नीट मांडणी–आखणी केली. दरसाल नवे दप्तरदार तयार व्हावे. राज्यातली छोटी छोटी दप्तरे त्यानी सांभाळावी, त्यांचे शास्त्रोक्त " रक्षण " करण्याचे सामर्थ्य या नवशिक्यांना प्राप्त व्हावे, म्हणून सुरेंद्रनाथ मनापासून झटले. मुख्य म्हणजे दप्तरातील कागद संपादण्यासाठी बाहेरच्या विद्वानांना पाचारण करण्याचा शिरस्ता त्यानी चांगला जारी केला.

## परकी प्रवाशांचे भारतवर्णन

हिस्टॉरिकल रेकॉर्डस कमिशनची फेर–मांडणी हे त्यांचे दप्तरखान्याबाबतचे दुसरे मोठे कार्य. पूर्वी त्यात काही शेलक्या सरकारजमा लोकांचाच समावेश होई. इतरांना त्यात प्रवेश मिळणे दुरापास्त असे. इतकेही करून सर्वच सभासद सारख्या प्रतीचे कार्यप्रवण नव्हते. केवळ अधिकार हुद्दा म्हणून सभासद बनलेले अधिकारी अतःपर त्यात उरले नाहीत. प्रत्यक्ष संशोधक, लेखक, अभ्यासू अशांचा समावेश सुरेंद्रनाथांनी त्या हि० रे० कमिशनमध्ये केला. यामुळे कित्यक मिरासदार ह्या नव्या पुनर्रचनेबाबत गिल्ला करू लागले. पण सेन यांचे प्रत्येक कृत्य सनदशीर असल्याने त्याविरुद्ध केलेली ओरड फुकटची कोल्हेकुई ठरली.

पूर्वीचे इंपीरिअल रेकॉर्डस् हे नाव जाऊन त्याचे नॅशनल आर्काइज् हे नामांतर डॉ. सेन यांच्या कारकिर्दीत घडून आले. संपादक-कौशल्याचा एक उत्कृष्ट आदर्श साहित्यिकांपुढे ठेवण्यासाठी ह्या दप्तरखान्यात सुरेंद्रनाथांनी तयार केला. " थिवेनो आणि कॅरिरी " यांचे प्रवासवर्णन असा ह्या ग्रंथाचा विषय. त्याचे महत्त्व विविध प्रकारचे होते. थिवेनो हा फ्रेंच प्रवासी ( ज. १६३३– मृ. १६६७ ) हिंदुस्थानात आला–हिंडला– आपल्या प्रवासाची माहिती त्याने सविस्तर लिहून ठेवली. स. १६६६ च्या जानेवारीत ( ता. १० ) तो सुरतेस उतरला– अहमदाबात, खंबायत, औरंगाबाद, हैदराबाद, मच्छलीपट्टण, बिदर, बऱ्हाणपूरमार्गे तो परत सुरतेस पोचला. आणि फेब्रु. १६६७ मध्ये तो स्वदेशी जाण्यास निघाला. त्याची प्रवासवर्णने फ्रेंचमध्ये लोकप्रिय होती. जगभर भटकत निघालेला हा मुशाफर. प्रत्यक्ष पाहून लिहिलेल्या विविध माहितीमुळे ती वर्णने पुनः पुनः छापली गेली. डच, जर्मन, इंग्रजी भाषात त्याचे अनुवाद झाले. त्यांच्याही अनेक आवृत्त्या निघाल्या. पण हिंदुस्थानसंबंधी वर्णन पुष्कळांनी गाळले. भारतीय इतिहासासाठी ह्या " चक्षुर्वै-सत्यम् " वर्णनाची उपयुक्तता ओळखून ह्या प्रवाशांच्या भारतयात्रेचा भाग ( इंग्रजी अनुवाद ) वेगळा छापण्याचे हिंदुस्थान सरकारने ठरविले. तेच काम सेन यांनी मन लावून, अतिशय मेहनत घेऊन, पुरे केले.

कॅरिरी हाही धाडसी मुशाफर, दुनियेभर भटकणारा. ( ज. १६६१ मृ. १७२५ ). त्याची भारत यात्रा जाने. स. १६९५ त सुरू झाली. चार सवाचार महिनेच तो इकडे राहिला. पण तेवढ्यात वसई, तारापूर, घोडबंदर, कान्हेरी, मंडपेश्वर, गोवे, गलगली, इत्यादि ठिकाणी तो गेला. प्रेक्षणीय ठिकाणे त्याने पाहिली. त्याबद्दल विस्तृत वर्णने त्याने लिहून ठेवली. चित्रेही काढली. कान्हेरी लेण्यांचे वर्णन लिहिणारा हाच पहिला परदेशी फिरस्ता. गलगलीस तो औरंगजेब बादशहास भेटला ( १९-२१ मार्च १६९५ ). मे महिन्यात गोव्याहून त्याने प्रयाण केले. याचीही पुस्तके पुष्कळ छापली, पुष्कळ भाषात प्रसिद्ध झाली. भारतयात्रेचा तेवढा भाग डॉ. सेननी आपल्या पुस्तकात घेतला.

ह्या दोन्ही प्रवाशांची भारतवर्णने संपादन करण्यासाठी सुरेंद्रनाथांनी किती मेहनत घेतली, किती देश-विदेशच्या पंडितांना पत्रे लिहिली, त्यांजकडून माहिती मिळविली, तो तपशील वाचनीय आहे. सर्वज्ञतेचा आव आणून ते संपादन कार्य संपविणे फार सोपे झाले असते. पण खरी जिज्ञासू वृत्ती, खरी विद्यार्थ्याची वृत्ती त्यांची असल्याने, सेननी भयंकर खटाटोप केला. पशु-पक्षी, वनस्पति, भिन्न रीतरिवाज, औषधे, कपडालत्ता... यांचा सूक्ष्म अभ्यास केला आणि एक विद्वत्तापूर्ण - अभ्यासजड–ग्रंथ वाचकास सादर केला.

दप्तरखान्यातले हे त्यांचे मुख्य कार्य मुद्दाम विस्ताराने सांगितले. पण त्यांच्या एका गुप्त-दानाची परिस्फुटता याच ठिकाणी करावयाची आहे. दप्तरखान्याचे प्रमुख












म्हणून ब्रिटिश अमदानीत त्यांजकडे दरसाल पृच्छा होई की "कुणास पदवी देण्याबद्दल आपली शिफारस आहे काय?" सुरेंद्रनाथांनी विद्वानांना पदव्या देवविल्या. प्रा. दत्तो वामन पोतदारांना "महामहोपाध्याय" आणि अन्नमलाई विद्यापीठातल्या डॉ. चिक्का श्रीनिवासाचार्यांना 'दिवाणबहादूर.' याबद्दल खुद्द सेनांचे स्वदस्तुरचे पत्र मजजवळ आहे. पोतदारांनी दुसरी कोणती पदवी पत्करली नसती, त्यांना इतर कोणतीही पदवी शोभून दिसली नसती. पण "महामहोपाध्याय" ही उपाधि त्यांनी नाकारली नाही. असो.

## दिल्ली विद्यापीठाचे कुलगुरु

राष्ट्रीय दप्तरखान्यात असल्यापासूनच सेन दिल्ली विद्यापीठात इतिहास शिकवीत असत. सेवानिवृत्त झाल्यावर त्यांना त्या विद्यापीठात प्रथम काही दिवस रेक्टर आणि नंतर कुलगुरु म्हणून काम करावे लागले. कॉलेजमध्ये जावे न जावे या अडचणीत पडलेला हा नवजवान दिल्ली विद्यापीठाचा कुलगुरु होईल, याची कल्पनाच कुणाला नव्हती. पण ह्या सारख्या बढतीमुळे सेन यांच्या साधेपणात फरक पडला नाही. अधिकाराचा मद म्हणतात, तो त्यांना बाधला नाही. ताठा नाही, उर्मटपणा नाही. अधिकाराच्या पोटी दडलेले कुठलेही दुर्गुण डॉ. सुरेंद्रनाथांच्या अंगी आले नाहीत. कलकत्त्यात प्राध्यापक असताना, दिल्लीत दप्तरदार झाले तेव्हा, विद्यापीठात रेक्टर व कुलगुरु असताना, सर्व प्रसंगी मी त्यांजकडे गेलो- त्यांचे हार्दिक स्वागत, मुद्दाम मराठी बोलण्याचा आग्रह, पूर्वी होता तसाच कायम होता. त्यात उणेपणा तिळमात्र नव्हता.

## स्वदेशेषु धन्यः – विदेशेषु मान्यः

दिल्ली विद्यापीठाचे कुलगुरूपद सेनांना लाभले खरे. पण तिथल्या कारस्थानी राहणीला ते विटले, वैतागले, संतापले! सर मॉरिस ग्वायर सारख्या विद्वानाने, स्वतः स्वदेशत्याग पत्करून, दिल्ली विद्यापीठास वाहून घेतले होते. तेही कित्येक राष्ट्रीय महाभागांना पाहवले नाही. त्यांनी कारस्थाने रचून मॉरिसांना राजीनामा देणे भाग पाडले. मोठ्या दुःखावेगात तो विधिविशारद न्यायमूर्ति नाखुषीने परत स्वदेशी गेला. आर्थिक लाभासाठी तो तेथे नव्हता. पण राजधानीतले विद्यापीठ श्रेष्ठ प्रतीचे करावे, ते करण्याचे भाग्य आपणाला लाभावे, एवढीच त्या एकाकी जीवाची महत्त्वाकांक्षा! पण शेवटी दिल्लीतल्या कारस्थानी जीवनाला ते बळी पडले, म्हणून सुरेंद्रनाथांची नेमणूक ते कारस्थान पुरे पार पडू नये म्हणून झाली. पण शेवटी दुसऱ्या काही कारस्थानांना बळी पडून सेनही, सर मॉरिस ग्वायर प्रमाणे राजीनामा देऊन निराश होत्साते बाहेर पडले!! (स. १९५३ जाने.) पण त्यांच्या कार्याचे क्षेत्र आणखी वाढावयाचे होते. आणखी मोठे सन्मान त्यांना मिळून भारतीयांची कीर्ति विद्वज्जनात आणखी फैलावणार होती.

"स. १८५७" ची शंभरी साजरी करण्यासाठी एक इंग्रजी ग्रंथ लिहिण्याची कामगिरी त्यांजवर येऊन पडली. तिजसाठी त्यांना इंग्लंडला जावे लागले. तो ग्रंथ पुरा झाल्यावर, त्याचा हिंदी अनुवाद प्रसिद्ध झाल्यावर सेन यांस एका अमेरिकन युनिव्हर्सिटीने बोलावले. ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटीने (स. १९५८) त्यांना डॉक्टर ऑफ लिटरेचर ही पदवी बहाल केली. तमाम हिंदुस्थानात ह्या पदवीला लायक असे दोनच विद्वान होते. अतःपर तीन झाले!!

पण ही पदवी घेताना डॉ. सेन एखाद्या बालकाप्रमाणे परावलंबी होते. पक्षघाताने ते अमेरिकेतच आजारी झाले आणि तशाच अवस्थेत त्यांना ऑक्स्फर्डला न्यावे लागले. तिसऱ्या भारतीयाचा हा बहुमान पत्करण्यासाठी जातीने हजर रहाण्याची त्यांची दांडगी इच्छा होती.

जागतिक क्षेत्रात एवढी प्रतिष्ठा लाभलेल्या ह्या विद्वानास स्वदेशातही आधी मान्यता मिळाली होती. भारतीय इतिहास परिषदेचे अध्यक्षस्थान त्यांना लाभले (स. १९४४). मद्रास युनिव्हर्सिटीच्या सर विल्यम मेयर व्याख्यानमालेसाठीही त्यांची निवड झाली. (स. १९५२). महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांच्या साठीनिमित्त त्यांना अर्पण केलेल्या स्मारकग्रंथाची संपादकीय जबाबदारी सेननी पत्करली आणि त्या समारंभासाठी मुद्दाम पुण्यास येऊन त्यांनी सुमारे सवातास मराठी भाषण केले!! हा विक्रम और होता. कलकत्त्याचे शेरीफ होण्याचा मानही त्यांना मिळाला होता.








### त्यांच्या कार्याचे मूल्यमापन

सुरेंद्रनाथ सेन यांनी मराठ्यांची ( शिवछत्रपतींची, पेशव्यांची ) राज्यपद्धति कशी होती ते साधार समजावून सांगितले. मराठे नुसते लुटारू होते– पुंड होते –हा आरोप त्यानी समूळ खोडून काढला. लष्करावर अवलंबून असणारी सर्व राज्ये लुटालूट करतातच; त्यात काही नवल नाही, असे त्यानी स्पष्टपणे सांगितले. मराठ्यांच्या वेळची ब्रिटिशांची लूट काही निराळी नव्हती, कमी नव्हती, हे त्यानी पटवून दिले. सुरेंद्रनाथांनी आपण होऊन मराठ्यांचा कैवार घेतला, त्यांची बाजू जगभर फैलावेल अशा भाषेत मांडली, हे त्यांचे फार मोठे कार्य होय. मराठी भाषा ते शिकले, मराठी मित्रमंडळींशी ते मराठी बोलत, त्या भाषेतला विनोद त्याना कळत असे. मराठी पद्धतीच भोजन करण्यास त्यानी आपल्या गृहिणीस शिकविले. मराठी पोषाखही ते मधून मधून वापरीत. इतक्या आत्मीयतेने, तन्मयतेते ते मराठी इतिहास लिहीत, वाचीत. वंग-महाराष्ट्र-ऐक्याचे चालते बोलते प्रतीक म्हणून सेनकडे अंगुलिनिर्देश करता येईल. त्यांचे पहिले पुस्तक शिवछत्रपतींचे चरित्र आहे. पण सर्व पुस्तक इंग्रजी असता त्याची अर्पणपत्रिका मात्र मराठी, रामदासी विशेषणांनी अलंकृत अशी आहे.

एकराष्ट्रीयत्वाची जाणीव सुरेंद्रनाथांना झाली होती तेवढी इतरांना क्वचित् झाली असावी. मराठ्यांविरुद्ध परकीय इतिहासकारांनी लिहिले म्हणून खुद्द मराठ्यांचे रक्त किती सळसळले कोण जाणे, 'सेन यांचे रक्त मात्र इतके सळसळले की त्यांनी ते आरोप खोडून काढण्यासाठी मुद्दाम पुस्तके लिहिली. जुन्या तिथीप्रमाणे ( स. १९२७ मध्ये ) त्रिशतसांवत्सरिक शिवाजी उत्सव साजरा झाला, त्या वेळी परभाषेत असलेली शिवचरित्रपर माहिती एकत्र करून परभाषी– परकीय– शिवचरित्रे हा जाडजूड ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केला.

परभाषेतील नवे साहित्य हुडकून, इतर उपलब्ध साहित्याशी त्याची सांगड घालून इतिहास सुबोध रीत्या सांगण्याचे चातुर्य सेन यांचे अंगी पुष्कळ होते. त्यांचा अभ्यास दांडगा, वाचन व्यापक आणि वर्ण्य विषयांशी तादात्म्यपावण्याची एकाग्रता अपूर्व होती. नव्या विद्यार्थ्यांना अभ्यासाची गोडी लावावी, त्यांच्याकडून काम करवून घ्यावे, त्यांना उत्तेजन द्यावे, अशी सेन यांची उदार वृत्ति होती. साध्या राहणीचा आदर्श त्यांचा मानता येईल. राष्ट्रीय वृत्तीचा स्फुलिंग त्यांनी कधीच विझू दिला नाही, दिल्लीच्या वातावरणातही ते स्वतंत्र राहिले, सरकारजमा झाले नाहीत, हे त्यांचे खास वैशिष्टय म्हटले पाहिजे.

### तौलनिक

जदुनाथ सरकार आणि रियासतकार सरदेसाई यांच्या मानाने सुरेंद्रनाथ सेन म्हणजे एका पिढीने धाकटे. सरदेसाई यांचा जन्म स. १८६५ चा; जदुनाथांचा स. १८७० मधला तर सुरेंद्रनाथांचा स. १८९० चा. स्वदेशी–बहिष्कार चळवळीत सरकार किंवा सरदेसाई सामील झाले नाहीत पण सेन मात्र परदेशी कापड दुकानावर पिकेटिंग करणारे स्वयंसेवक झाले. फार काय, घरी गुप्त सभा भरवून क्रांतिकारी लढ्यासाठी शस्त्रे जमविण्यात पुढाकार घेणारे सेन होते, असे त्यांचे बालपणचे स्नेही सांगतात. जदुनाथ इंग्रजी काव्य वाचीत, त्यांचा अभ्यासही गाढा होता सरदेसायांना काव्याची आवड फारशी नव्हती. पण सेन स्वतः शीघ्र कवि होते. गोड गळ्याने स्वकृत बंगाली काव्य ( राष्ट्रीय वृत्तीचे ) सार्वजनिकरीत्या गाण्याबद्दल त्यांची ख्याति होती. त्यांच्या स्वदेशप्रेमी कवितांचा संग्रह बालपणीच छापला होता.

एका पिढीचे अंतर केवढे प्रभावी ठरले पहा ! जदुनाथ सी. आय. ई. झाले; पुढे त्याना 'सर' की मिळाली. सरदेसाई 'रावसाहेब', 'रावबहादुरी' मिळविते झाले. स्वराज्यात सरदेसायांना 'पद्मविभूषण' होता आले; पण जदुनाथांची कदर, ते राष्ट्रपतींच्या चांगल्या परिचनाचे असूनही स्वतंत्र भारतात झाली नाही. गुरुदेव टागोर किंवा आचार्य प्रफुल्लचंद्र यानी 'सर' की सोडली तशी जदुनाथांनी सोडली नाही, म्हणून स्वजनांचा त्यावर रोष झाला असावा.

पण स्वराज्यात किंवा ब्रिटिश राज्यात ही कोणतीच उपाधि सेननी स्वतःला लागू दिली नाही. इतराना पदवी बहाल करणारा हा अधिकारी अखेरपर्यंत उपाधिरहित राहिला ही मोठ्या कौतुकाची गोष्ट होय.

पुस्तक लेखनात, ऐतिहासिक दृष्टिकोनात ही राष्ट्रीय वृत्ति तिन्ही इतिहासकारांमध्ये स्पष्ट दिसते. सेन यांची उत्कट राष्ट्रीय भावना जदुनाथ किंवा सरदेसाई या



अनुक्रमणिका






उभयतातही नव्हती. पण राष्ट्रीय भावनेने सेन अंध झाले नाहीत. मराठ्यांचे दुर्गुण दाखविण्यास ते कचरले नाहीत. पण जदुनाथांनी मधून मधून मराठ्यांवर जशी (अस्थानी) टीका कली, तशी सेननी केली नाही. खुद्द सरदेसायांचा मराठ्यांबद्दलचा अभिमान व्यक्त झाला नाही, इतक्या स्पष्टपणे सेनांचा अभिमान त्यांच्या पुस्तकात वारंवार आढळतो.

एवढे असूनही सेन यांचे संशोधन मौलिक आहे; ते विचिकित्सक पद्धतीने केले आहे, त्यात ढिलेपणा नाही. मात्र जदुनाथ आणि सुरेंद्रनाथ यांचे केव्हा आणि का बिनसले ते समजत नाही. अनेक पत्रात जदुनाथांनी सेनवर गहजब उडविला आहे. कीपर ऑफ रेकॉर्डस् होण्यास ते योग्य नाहीत असा आपला सल्ला त्यानी हिंदुस्थान सरकारच्या ब्रिटिश अधिकाऱ्यास विचारल्यावरून कळविला होता! सेनच्या प्रथम पुस्तकाचे हस्तलिखित पाहून त्यात सुधारणा सुचविण्याचे आणि "आपला ग्रंथसंग्रह" त्यास उपलब्ध करून देण्याचे सौजन्य प्रो. जदुनाथ सरकारांनी दाखविल्याचे सेननी जाहीररीत्या नमूद केले आहे. पण पुढे काय झाले? जदुनाथ कुलगुरु (व्हा. चॅ.) असताना सेनांचा एक प्रबंध (पी. एच्. डी.) नाकारलेला नमूद आहे. त्या प्रबंधात इंग्रजी व मराठी उतारे वाचण्यातील जदुनाथांच्या चुका स्पष्टपणे, जाहीररीत्या, दाखविल्या आहेत. ह्या धाष्टर्याबद्दल कुलगुरूंनी परस्पर शिक्षा देवविली की काय?

जदुनाथ आणि सुरेंद्रनाथ यामधील साम्य लक्षात घेण्याजोगे आहे. दोघेही प्रेमचंद रायचंद स्कॉलर होते. दोघांनीही "मिलिटरी" बद्दल लिहिले. दोघांनाही मद्रास विद्यापीठातील मेयर व्याख्यानमाला गुंफण्याचा मान मिळाला. उभयतांचे विषय ("इंडिया थ्रू"—दि एजिस–सरकार; चायनीज आईज्–सेन) असे होते. दोघांनीही मराठीचा अभ्यास चांगल्या प्रकारचा केला होता. सरकार कलकत्ता युनिव्हर्सिटीचे तर सेन दिल्ली युनिव्हर्सिटीचे कुलगुरू झाले. हिस्टॉरिकल रेकॉर्डस् कमिशनमध्ये उभयतांची कामगिरी, भिन्न भिन्न काळी उच्च दर्जाची ठरली. आम्हां मराठ्यांचा इतिहास उभयतांनी भिन्न प्रकारे नटवून सजवून जगापुढे





अनुक्रमणिका

मांडला. उभयतांनी आपले ग्रंथसंग्रह नॅशनल लायब्ररीस दिले, राष्ट्राला अर्पण केले ! !

## अखेरचे दुखणे, दुखण्याची अखेर

पक्षघाताने आजारी होऊन विकलांग झालेले सेन पाहून मानवी नश्वरतेबद्दल विषाद वाटे. अनेकदा सेनना भेटायला गेल्यावर त्यांच्या डोळ्यातून अश्रू ओघळत, एखाद्या बालाप्रमाणे ते रडू लागत. " तुमच्याशी मला बोलवत नाही. तुमचे स्वागत करता येत नाही काय माझी ही असहाय्यता ? " म्हणून ते शोकविव्हल होत. सौजन्याची ही परमावधि होय. शेवटची तीन चार वर्षे त्यांची शुश्रूषा करणारांची सत्त्वपरीक्षा होत होती जशी काही ! सत्तरीस आलेला हा वयोवृद्ध अजाण बालाप्रमाणे परावलंबी होता. त्याला पाणी पाजवावे लागे, भोजन भरवावे लागे. पण थोडे बोलता येऊ लागल्यावर विनोद, उत्साह, ईर्षा अगदी जवानीत होती तशी प्रतीत होत असे.

मराठ्यांचा अभिमानी, मराठी इतिहासाचा आत्मीय वृत्तीचा व्यासंगी, मराठी भाषेवर आणि मराठ्यांवरही नितांत प्रेम करणाऱ्या ह्या वंग विद्वानाच्या चरणी शतशः प्रणाम !

### आयुःक्रम ( स. १८९०–१९६२ )

२९ जुलै १८९० जन्म माहिलाडा ( पूर्वबंगाल )
१९०५ एंट्रन्स परिक्षा पास ( बाटाजोड )
१९०८ एफ. ए. ,, ,, ( बारिसाल )
१९११ ढाका कॉलेजात अभ्यास सुरू
१९१३ बी. ए. ( ऑनर्स )
१९१५ एम्. ए.
जुलै १९१६ जबलपुरी प्राध्यापक
१९१७ कलकत्ता विद्यापीठात प्राध्यापक
* १९२५–२६ विलायतची वारी B. Litt संपादन
१९३१ " आशुतोष प्रोफेसर "
१९३९ दिल्लीस " कीपर " म्हणून नेमणूक
१९४४ इतिहास परिषदेचे अध्यक्ष
१९४९ दप्तरखान्यातून निवृत्त
१९४९–५० रेक्टर दिल्ली विद्यापीठ
१९५०–५३ कुलगुरु ,, ,,
१९५७–५८ अमेरिकेत वास्तव्य विस्कॉन्सिन विद्यापीठात ( पक्षघाताचा आजार )
१९५८ ऑक्सफर्ड – डी. लिट्.
३० ऑक्टो. १९६२ निधन ( कलकत्ता )

* एंपायर युनिव्हर्सिटीज् कॉन्फरन्स-( ३ रे अधि० ) ला कलकत्ता विद्यापीठाचे प्रतिनिधि. त्यावेळी युरोपातील निवडक दप्तरखान्यांची पाहणी– बी. लिट् उपाधि प्राप्ति.

| सन | इंग्रजी ग्रंथ |
|---|---|
| १९२० | शिवछत्रपति |
| १९२३ | मराठ्यांची राज्यपद्धति |
| १९२५ | दुसरी आवृत्ति " " |
| १९२७ | छत्रपतींची परकीय चरित्रें |
| १९२८ | मराठ्यांची लष्करी व्यवस्था |
| १९३० | स्टडीज इन इंडियन हिस्टरी |
| १९४४ | ऑफ द मेन ट्रॅक |
| ? ? | रिपोर्ट ऑन हिस्टॉरिकल रेकॉर्डस इन गोवा |
| १९४८ | दिल्ली अँड इट्स् मॉनुमेंटस् |
| १९४९ | एज्युकेशन रीफार्म्स ऑफ आशुतोष मुकर्जी |
| १९४९ | थिवेनो अँड करिरि ( संपादन ) |
| १९५० | पोतदार कॉमेमो० व्हॉल्यूम संपादन –( मराठी- इंग्रजी ) |
| ? ? | अर्ली करीयर ऑफ कान्होजी आंग्रे |
| १९५६ | इंडिया थ्रू चायनीज आईज. –( मेयर लेक्चर्स ) |
| १९५७ | " एटीन फिफ्टीसेवन " |
| १९५८ | दुसरी आवृत्ति ( मिलिटरी सिस्टिम ) |

### बंगाली पुस्तके

मिनति – देशप्रीतिपर काव्ये
प्राचीन बंगला पत्रसंकलन ( संपादन )
शालेय इतिहासाची पुस्तके
अशोक
आपले पक्षी, वगैरे.









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

डॉ. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# वेदांचा काल (उत्तरार्ध)

## मेरे मुरगी की टांग

यापैकी पहिला व सर्वात महत्त्वाचा उल्लेख वेदाङ्ग ज्योतिषातला आहे. या ग्रंथात लगधाने शिकविलेल्या ज्योतिर्विद्येचे विवेचन आहे. सारा ग्रंथच ज्योतिःशास्त्र-विषयक असल्यामुळे त्यातले उल्लेख निःसंदिग्ध मानले पाहिजेत. हे उल्लेख असे :

(१) पाच वर्षांचे एक युग होते. हे युग सुरू होते तेव्हा सूर्य, चंद्र व धनिष्ठा नक्षत्र ही एकत्र असतात; माघ महिन्याची प्रतीपदा असते व उत्तरायण सुरू झालेले असते. (स्वराक्रमेते सोमार्कौ यदा साकं सवासवौ। तदादियुगं माघस्तपः शुक्लोऽयनं ह्युदक्॥)

(२) श्रविष्ठा नक्षत्रात उत्तरायण सुरू होते. (प्रपद्येते श्रविष्ठादौ सूर्याचन्द्रमसावुदक्।)

या उल्लेखांच्या अर्थाबद्दल कोणीही वाद केलेला नाही. या उल्लेखात वर्णिलेली आकाशस्थिति ख्रिस्तपूर्व १४०० ची आहे असे श्री. शं. बा. दीक्षित यांनी गणिताने सिद्ध केल आहे. कौलब्रुक, विल्यम जोन्स, हौग वगैरे पाश्चात्य पण्डितांनी देखील थोड्या फार फरकाने वेदाङ्गज्योतिषाचा हाच काल मानला आहे. पण मॅक्समूलर वगैरे पण्डितांनी हा उल्लेख कुणीतरी मागाहून केला असला पाहिजे अशी यातून "मेरे मुरगीकी एकही टांग" या न्यायाने पळवाट काढली आहे. अशाच पळवाटा काढायच्या तर एखाद्या शिलालेखावर लिहिलेली तारीख देखील कुणीतरी मागाहून टाकली म्हणून वाटेल त्या राजाला वाटेल त्या काळात ओढता येईल.

यानंतरचा महत्त्वाचा उल्लेख मैत्रायणीय उपनिषदातला आहे. त्याच्या अनुसार श्रविष्ठा नक्षत्राच्या मध्यात उत्तरायण सुरू होऊन मघा नक्षत्राच्या सुरुवातीस संपत असे. (एतस्याग्नेयमर्धमर्धं वारुणं मघाद्यं श्रविष्ठार्धमाग्नेयं क्रमेणोत्क्रमेण सार्धाद्यं श्रविष्ठार्धान्तं सौम्यं तत्रैकमात्मनो नवांशकाः। ) ही परिस्थिति ख्रिस्तपूर्व १९०० ची आहे, असे गणितावरून दिसते.

## वर्षाऋतु

तिसरा उल्लेख कौषीतकी ब्राह्मणातला आहे. तो असा : "मध्यावर्षे पुनर्वसू नक्षत्रमुदीक्ष्य पुनरादधीत न तस्मिन्काले पूर्वपक्षे पुनर्वसुभ्यां सम्पद्यते ये वैणाषाढ्या उपरिष्ठादमावास्या भवति तस्यां पुनरादधीत सा पुनर्वसुभ्यां सम्पद्यते उपात्तोऽमावास्यायां कामोभवत्युपात्तो वर्षासूपात्तः पुनर्वस्वोः।"

"वर्षाऋतूच्या मध्यात पुनर्वसु नक्षत्र पाहून आधान करावे. या काळी महिन्याच्या पहिल्या पंधरवड्यात (चंद्राचा) पुनर्वसूशी योग होत नाही. आषाढी-नंतर जी अमावास्या येते तेव्हा आधान करावे, कारण ती पुनर्वसूनी सम्पन्न असते. अमावास्या, वर्षाऋतु व पुनर्वसु यानी मनोरथ पूर्ण होतात."

या विधानावरून कौषीतकी ब्राह्मणाच्या काळी आषाढी अमावास्या व पुनर्वसु नक्षत्र हे वर्षाऋतूच्या मध्ये पडत नव्हते हे स्पष्ट आहे. पण मध्ये पडत नसले तरी ही तिथि वर्षाऋतूचीच समजली जात असल्यामुळे ती वर्षाऋतूच्या सुरवातीस पडत असावी असे अनुमान होते. वर्षाऋतूची सुरवात हल्ली साधारणपणे ज्येष्ठ शुद्ध प्रतिपदेस होते व कौषीतकी ब्राह्मणाच्या काळी ती आषाढी अमावास्येस होत असे म्हणजे वर्षाऋतु हल्लीच्या मानाने साठ दिवसांनी नंतर सुरू होत असे. वर्षाऋतूच्या आरंभात एवढा फरक पडण्यास संपातबिंदु ६० अंश मागे सरकायला पाहिजे. याला, ४३२० वर्षे लागतात. म्हणजे कौषीतकी ब्राह्मणाचा काल साधारणपणे ख्रिस्तपूर्व २४२६ मानायला हरकत नाही. साधारणपणे म्हणण्याचे कारण असे की वर्षाऋतूचा आरंभ हा संपात किंवा अयनान्त याप्रमाणे एक निश्चित दिवस नाही.

## कृत्तिकांचा उदय

कौषीतकी ब्राह्मणापेक्षांही अधिक निःसन्दिग्ध उल्लेख शतपथ ब्राह्मणातला आहे. किंबहुना वेदाङ्गज्योतिषाच्या खालोखाल हा उल्लेख वेदकालाच्या बाबतीत सर्वात








निर्णायक आहे असे म्हणायला हरकत नाही. हा उल्लेख असा –

" एता ह वै (कृत्तिका) प्राच्यै दिशो न च्यवन्ते । सर्वाणि ह वा अन्यानि नक्षत्राणि प्राच्यै दिशश्च्यवन्ते ।"

" कृत्तिका पूर्व दिशेपासून ढळत नाहीत, बाकी सर्व नक्षत्रे पूर्व दिशेपासून ढळतात. "

या विधानावरून असे स्पष्ट दिसते की शतपथ ब्राह्मणाच्या काळी कृत्तिका थेट पूर्वेकडे उगवत असत. थेट पूर्वेकडे उगवण्यासाठी त्या विषुववृत्ताच्या पातळीत असल्या पाहिजेत. विषुववृत्ताची पातळी बदलल्यामुळे हल्ली त्या थोड्या उत्तरेकडे उगवतात. हा बदल घडून येण्यास सुमारे ५००० वर्षे पाहिजेत. म्हणजे शतपथ ब्राह्मणाचा काल खिस्तपूर्व ३००० असला पाहिजे.

हा उल्लेख इतका निर्णायक आहे की त्यामुळे वेद-कालासंबंधीच्या वादावर पडदा पडायला पाहिजे होता. पण तसे घडले नाही, इतकेच नव्हे तर वेदकालाची चर्चा करताना अनेक पंडित याचा उल्लेख देखील करीत नाहीत ! उल्लेख करणाऱ्यांच्या अज्ञानावर वा दुराग्रहावर औषध नाही. पण ज्यांनी त्याची दखल घेतली आहे त्यांच्या आक्षेपांचा विचार करणे अवश्य आहे.

वैदिक कर्मकांडात आकाशस्थितीच्या अचूक अव-लोकनाचे किती महत्त्व होते याची ज्यांना कल्पना नाही त्यांना असे वाटते की " कृत्तिका पूर्वेकडे उगव-तात " हे विधान " सूर्य पूर्वेकडे उगवतो " यासारखे ढोबळ विधान आहे. पण एवढेच म्हणायचे असेल तर या विधानाचे प्रयोजनच उरत नाही. या अर्थाने कृत्ति-काच कशाला चंद्र, सूर्य व इतर नक्षत्रेही पूर्वेकडेच उगवतात.

यापेक्षा विचारणीय आक्षेप विंटरविट्झ व दत्तरी यांचा आहे. यांचे म्हणणे असे की या विधानात कृत्तिका पूर्वेकडे " उगवतात " असा शब्द नाही. पण त्या पूर्वेकडे उगवल्याच नाहीत तर " पूर्वेपासून ढळत नाहीत " हे म्हणणे गैरलागू होते म्हणून डॉ. दत्तरींनी अशी शक्कल लढवली आहे की उगवण्याच्या वेळी म्हणजे क्षितिजावर असताना कृत्तिका दिसतच नाहीत. त्या दिसतात तेव्हा क्षितिजाच्या १३ अंश वर आलेल्या असतात. अर्थात् १३ अंश वर आल्यावर त्या थेट पूर्वेकडे दिसल्या तरी शतपथ ब्राह्मणातले विधान त्याना लागू होते. १३ अंश वर आल्यावर कृत्तिका थेट पूर्वेस दिसण्याचा काल खिस्तपूर्व १८०० हा देखील असू शकतो. म्हणून शतपथ ब्राह्मणाचा काल खिस्तपूर्व ३००० हे मत असिद्ध ठरते.

## दीक्षितांचा अचल सिद्धान्त

डॉ. दत्तरींचा हा आक्षेप अनेक दृष्टींनी निराधार आहे. एकतर चन्द्रहीन पण निरभ्र रात्री सूर्यास्तानंतर किंवा सूर्योदयापूर्वी दोन तास आधी कृत्तिका उगवतात तेव्हा-देखील तीक्ष्ण दृष्टीच्या माणसास त्या दिसू शकणार नाहीत असे दत्तरींनी दाखवून दिलेले नाही. इतर ज्योतिर्विद या बाबतीत त्यांच्याशी सहमत नाहीत. डेहराडून येथील सर्व्हे ऑफ इंडियाच्या ज्योतिष शाखेकडे मी विचारणा केली तेव्हा कृत्तिकांमध्ये तिसऱ्या प्रतीचा तेजस्वी तारा असल्यामुळे त्या क्षितिजावर असताना देखील दिसण्यास काहीच हरकत नाही, असे उत्तर मिळाले. दुसरे असे की क्षितिजाच्या वर आल्यावर फक्त कृत्तिकाच पूर्वेकडे दिसतील असे नाही, इतरही अनेक नक्षत्रे पूर्वेकडे दिसतील पण दुसरे कोणतेच नक्षत्र थेट पूर्वमार्गा-वर राहात नाही असे लगेच पुढे विधान आहे. त्याकडे डॉ. दप्तरींनी दुर्लक्ष केले आहे. तिसरे असे की, " कृत्तिका पूर्वेपासून ढळत नाहीत हे विधान कृत्तिका पूर्वेकडे उगवतात " या विधानापेक्षाही अधिक निश्चित आहे. कारण उदयाच्या वेळी कृत्तिका दिसतच नाहीत अशी डॉ. दप्तरींप्रमाणे दुसऱ्या विधानापासून पळवाट काढता येते, पहिल्या विधानात ती शक्यता नाही. कृत्तिका पूर्वेपासून कधीच ढळत नाहीत म्हणजे त्या प्रथम दिसतात तेव्हापासून खमध्याच्या जवळ येईपर्यंत केव्हाही पाहिले तरी पूर्वमार्गावरच दिसतात.

१. Since the Pleiades group has got a star of nearly the third magnitude, it should normally be visible to the naked eye at the time of its rise.








हे त्या थेट पूर्वेकडे उगवल्या तरच शक्य[२] आहे, दुसरीकडे उगवून काही काळाने पूर्वमार्गावर आल्या तर त्या तेथे कायम राहाणार नाहीत, तेथून दुसरीकडे सरक लागतील.

तात्पर्य शतपथ ब्राह्मणातील उल्लेखावरून श्री. शं. बा. दीक्षित यानी ठरवलेला काल हा प्राचीन भारतीय इतिहासातला भगवान बुद्धाच्या कालासारखा एक निश्चित काल समजावयाला हरकत नाही.

शतपथ ब्राह्मणाचा काल खिस्तपूर्व ३००० हे निश्चित झाल्यावर ब्राह्मण वाङ्मयाची प्राचीन मर्यादा कोणती असा प्रश्न उद्‌भवतो. या प्रश्नाचे उत्तर तैत्तिरीय ब्राह्मणातील एका उल्लेखावरून देता येते. या उल्लेखानुसार बृहस्पति म्हणजे गुरु प्रथम दिसला तो तिष्य नक्षत्राचा ग्रास करताना. ( बृहस्पतिः प्रथमं जायमानः तिष्यं नक्षत्रमभिसम्बभूव । ) येथे अभिसम्बभूव असा भूतकाळ असल्यामुळे तैत्तिरीय ब्राह्मण पूर्वी घडलेली घटना सांगत आहे हे स्पष्ट आहे. ही घटना खि. पू. ४६५० मध्ये घडली. अर्थात तैत्तिरीय ब्राह्मण किंवा एकन्दरीतच ब्राह्मणवाङ्मय यानन्तरचे आहे हे सिद्ध आहे.

पण ब्राह्मणवाङ्मय यानंतरचे असले तरी मूळ वैदिक ऋचा किंवा वैदिक संस्कृति यानंतरची मानता येत नाही. असे मानल्यास वैदिक संस्कृतीशी काहीच संबंध नसलेल्या लोकांनी गुरुतिष्यांची भेदयुति पाहिली व ही गोष्ट त्यांच्या करवी पुढे वैदिकांना कळली अशी द्राविडी प्राणायामाची कल्पना करावी लागेल. अशी कल्पना करायची काहीच जरूर नाही. वैदिक सूक्ते ब्राह्मणांच्या पुष्कळ पूर्वीची आहेत व ब्राह्मणकाल साधारणपणे खि. पू. ३०००चा आहे हे लक्षात घेतले म्हणजे गुरुतिष्यांची भेदयुति सूक्तांच्या काळीच वैदिकांनी पाहिली व तिचीच स्मृति तैत्तिरीय ब्राह्मणात ग्रथित केली आहे असे मानणे सयुक्तिक वाटते.

## अग्रहायन

सूक्ताचा काल साधारणपणे खि. पू. ४६५० पर्यंत मागे जातो असे लो. टिळक व प्रा. याकोबी यानी देखील इतर काही उल्लेखांच्या आधारे प्रतिपादले आहे. हे उल्लेख कृत्तिकांच्या उदयासंबंधीच्या उल्लेखाइतके निःसन्दिग्ध नाहीत. पण लो. टिळक व प्रा. याकोबी स्वतन्त्रपणे एकाच सिद्धान्तावर पोचले यावरून त्यांच्या प्रतिपादनाची विश्वसनीयता वाढली आहे.

तैत्तिरीय संहितेत फल्गुनी पूर्णमासी हे संवत्सराचे म्हणजे वर्षाचे मुख आहे असे वाक्य आहे. लो. टिळकांच्या मते या वाक्याचा अर्थ वेदकाली फाल्गुन पौर्णिमेस उत्तरायण सुरू होत असे असा केला पाहिजे. ( शरीराच्या वरच्या म्हणजे मुखाकडच्या भागाला उत्तरभाग म्हणतात. म्हणून वर्षाचा मुखाकडचा भाग म्हणजे उत्तरायण ). असा अर्थ केल्यास फाल्गुन पौर्णिमेस ज्या दिवशी रात्र सर्वात मोठी व दिवस सर्वात लहान असतो तो शिशिरातला अयनान्त पडत होता असे ठरते. फाल्गुनी पौर्णिमेस शिशिर अयनान्त पडला म्हणजे वसंतसंपात, सूर्य मृगशीर्षात असताना पडायला पाहिजे. मृगशीर्षाला अग्रहायन देखील म्हटलेले आहे. अग्रहायन म्हणजे हायनाचे ( वर्षाचे ) अग्र. अर्थात् वेदकाली नक्षत्रांची गणना व वर्षारंभ मृगशीर्षापासून होत असला पाहिजे. वसंतसंपात मृगशीर्षात पडण्याचा काल खि. पू. ४५०० हा आहे. याहीपेक्षा प्राचीन कालाचा उल्लेख पुनर्वसु नक्षत्राची देवता अदिति यज्ञारंभ करीत असे या विधानात मिळतो. यज्ञारंभ संपातासारख्या वर्षाच्या आरंभदिवशीच करीत. अर्थात् या काळी वसंतसंपात पुनर्वसूत येत असे, म्हणजे खि. पू. ६०००ची ही परिस्थिति आहे.

## वर्षारंभ व ध्रुवदर्शन

प्रा. याकोबी या जर्मन पंडिताने स्वतंत्रपणे हाच सिद्धान्त मांडला आहे. वेदकाली ग्रीष्मांतील अयनान्त हा वर्षाऋतूचा आरंभ मानीत, असे मंडूकसूक्त,

२. If a constellation does not deviate from the East-West line in its course, it must have risen exactly in the East anb it woula set exactly in the West.

— A communication from Survey of India & Research Branch, Dehra Dun.








सूर्यसूक्त वगैरेत उल्लेख आहेत असे त्याचे म्हणणे आहे. ग्रीष्म अयनान्त वर्षारंभी पडण्याचा काल खि. पू. ४००० चा आहे.

हे ज्योतिःशास्त्रविषयक युक्तिवाद वाचले म्हणजे आधुनिक वाचकाला अशी शङ्का येते की अमुक दिवशी वर्षारंभ होतो असे म्हटल्याने त्या दिवशी संपात किंवा अयनान्त असला पाहिजे असे कसे ठरते ? जानेवारी एक हा वर्षारंभ आहे. पण त्या दिवशी संपातही नाही व अयनान्तही नाही. तसेच वेदकालाचे वर्षारंभ असतील.

ही शंका दूर करण्यास ज्याच्याजवळ घड्याळ नाही असा मनुष्य दिवसातल्या वेळा कशा निश्चित करील याचा थोडा विचार केला पाहिजे. घड्याळाच्या साहाय्याने ऑफिसची वेळ दहा ठरवता येते पण घड्याळ नसल्यास दहा म्हटल्याने काय अर्थबोध होणार ! बिनघड्याळवाल्याला सूर्योदय, सूर्यास्त, मध्याह्न वगैरे वेळा सहज समजू शकतील पण दहा वाजता ही वेळ समजणे कठिण पडेल. त्याचप्रमाणे खिस्ती वर्षपद्धतीसारखी एखादी राजमान्य पद्धति अस्तित्वात नसेल तर संपात व अयनान्त हेच आरंभबिंदु सहज समजू शकतील. जानेवारी एकसारखा मनःपूत आरभ समजणे अशक्य होईल.

वेदकालासंबंधी वर्षारंभावर न आधारलेला असा याकोबीचा युक्तिवाद आहे. विवाहाच्या वेळी अचल प्रेमाचे प्रतीक म्हणून वराने वधूला ध्रुवाचा तारा दाखवावा असा विधि गृह्यसूत्रात सांगितलेला आहे. पण हल्ली आपण ज्याला ध्रुवाचा तारा म्हणतो तो खरोखर अचल नाहीच. दोन पदार्थांच्या खुणेने आवशीस ध्रुव पाहिला तर पहाटेस तो तेथे दिसत नाही. ही ध्रुवाची गति कळण्यास आधुनिक विज्ञानाची गरज आहे असे नाही. प्राचीन ग्रीक व मध्ययुगातील युरोपीय कोणताही तारा स्थिर आहे असे समजत नसत. तेव्हा स्थिर ताऱ्याची कल्पना हिंदूतच सापडते याला काही कारण असले पाहिजे.

हे कारण उघड आहे. ध्रुव दाखवण्याची चाल जेव्हा निघाली तेव्हा खरोखरीच एक ध्रुव म्हणजे न चळणारा तारा आकाशात होता. पृथ्वी आपल्या आसाभोवती फिरते. अर्थात् आसाच्या रेषेत एखादा तारा असेल तर तो हलताना दिसणार नाही. एखाद्या देवळाभोवती प्रदक्षिणा घालताना देवळाचा प्रत्येक भाग आपल्या विरुद्ध दिशेला जाताना दिसतो पण देवळाच्या कळसाचे टोक मात्र जागच्या जागी स्थिर दिसते. खि. पू. २७८० मध्ये कालिय Draconis नावाचा एक तारा अगदी पृथ्वीच्या आसाच्या रेषेत होता. खरा ध्रुवाचा तारा तो हाच. अर्थात् गृह्यसूत्रात सांगितलेला विधि खि. पू. तीन हजार वर्षांइतका प्राचीन आहे.

### सबळ सिद्धान्त

वेदकालासंबंधीच्या ठळक ज्योतिर्विषयक प्रमाणांचा आतापर्यंत आढावा घेतला. त्यावरून एक गोष्ट स्पष्ट नजरेस येते. ती म्हणजे ही सर्व प्रमाणे अन्योन्यसमर्थक आहेत. ही प्रमाणे संदिग्ध असोत की निश्चित असोत त्यांचा निष्कर्ष एकच आहे. तो म्हणजे खि. पू. ६००० वर्षे हा प्राचीनतम ऋचांचा काल, खि. पू. ४५०० हा अर्वाचीन ऋचांचा काल, खि. पू. ३००० हा ब्राह्मणांचा काल, खि. पू. २००० हा उपनिषदांचा काल व खि. पू. १४०० हा वेदाङ्गाचा काल. हे काल आधी ऋचा, मग ब्राह्मणे, त्यानंतर उपनिषदे, व सर्व वेदवाङ्मयानंतर वेदाङ्गे या सर्वमान्य अनुक्रमाशी जुळतो. तसेच ज्योतिर्विषयक प्रमाणे वापरून कुणालाही वेदकाल खि. पू. १००० वा १४०० पर्यंत ओढता आला नाही. पाश्चात्य पण्डित समजतात त्याप्रमाणे ज्योतिर्विषयक प्रमाणे स्वच्छन्दी असती तर ऋचांचा काल खि. पू. १००० वा १४०० च आहे हे त्यांचे आवडते मत त्यांना ज्योतिषाचा उपयोग करून देखील सिद्ध करता आले असते. सारांश वेदकाल सहा ते आठ हजार वर्षांइतका प्राचीन आहे या सिद्धान्ताइतका साधार सिद्धान्त अतिप्राचीन इतिहासात क्वचित्च सापडेल.

---

## वाचकांचा पत्रव्यवहार —

(१)

### " शैक्षणिक पुनर्घटना "

' गांधी स्मारक निधी'च्या वतीने दि. १७ व १८ ऑगस्ट १९६३ रोजी ' मणिभुवन ' मध्ये ' शाक्षणिक पुनर्घटना ' या विषयावर जो परिसंवाद झाला व त्या चर्चेत जे निष्कर्ष निघाले त्यांचे वाचन ' नवभारत ' ( ऑक्टोबर १९६३ ) मासिकातून घडले. हा परिसंवाद म. गांधीनी मांडलेल्या शिक्षण-विषयक कल्पनांच्या अनुरोधाने झाला होता आणि म्हणूनच या चर्चेतून काढलेले निष्कर्ष मला एकांगी वाटतात. महात्मा गांधींचे शिक्षणविषयक तत्त्वज्ञान पूर्णपणे समजून घेण्याचे प्रयत्न या परिसंवादात झाले नाहीत असेही मला म्हणावेसे वाटते.

महात्मा गांधींचे शिक्षणविषयक तत्वज्ञान पुढील प्रमाणे होते– विद्यार्थी हा राष्ट्राच्या उन्नतीचा एक प्रमुख घटक आहे. म्हणून स्वतंत्र देशात त्याला मिळणारे शिक्षण हे राष्ट्रीय ध्येय व गरजा यांच्याशी संवादी असले पाहिजे. राष्ट्रीय जीवनाचे ज्ञान देणारी शिक्षणपद्धति यासाठी आवश्यक आहे. शिक्षणास सामाजिक ध्येय असले पाहिजे. संपूर्ण वैयक्तिक महत्त्वाकांक्षेकडे लक्ष देणारे शिक्षण नको.

सेवा करण्याची उत्कृष्ट संधि शिक्षणाने मिळाली पाहिजे. प्रत्येक घर ही शाळा, प्रत्येक पिता हा शिक्षक, प्रत्येक झोपडी हे ' वर्कशॉप ', दररोजचे काम करणे हीच उमेदवारी, आणि कार्याचा प्रत्येक भाग हीच परीक्षा. इंग्रजी शिक्षणपद्धति ही घोकंपट्टी आहे. परीक्षा ही तेथे ' जुगार ' ठरते आणि पदवी ही तेथे पारितोषिक नसून फुकट ' पास ' असतो. पुन्हा या पद्धतीचे फळ काय ? तर शून्यवत् व निराकार यंत्रमय जीवन !

अशा प्रकारे गांधीजींचे शिक्षणविषयक तत्वज्ञान असताना सद्यःकालीन इंग्रजीछाप परीक्षामय शिक्षण-पद्धतीविषयी वरील परिसंवादात चर्चा होऊ नये हे आश्चर्य आहे. ही शिक्षणपद्धति कशा प्रकारे बदलावी याविषयी निष्कर्ष काढू नये हेही महदाश्चर्य आहे.

प्रत्येक पिता हा उत्तम शिक्षक बनला पाहिजे असे गांधीजींना वाटत असे. सध्यांच्या परिस्थितीत पुत्राची व पित्याची फारकत लक्षात घेता त्याविषयी काही तोड चर्चेमध्ये निघावयास पाहिजे होती.

विद्यार्थ्यांना मिळणारे आजचे शिक्षण ( परिसंवादात काढलेल्या निष्कर्षासह तसे शिक्षण द्यावयाचे म्हटले तरी ) हे राष्ट्राची ध्येये व गरजा यांना अनुसरून दिले जाते का हा वादग्रस्त मुद्दा आहे. परिसंवादात सध्यांच्या काळातील राष्ट्राच्या गरजांप्रमाणे शिक्षण देण्याची पद्धति शोधून काढायला पाहिजे होती. त्याविषयीच्या निष्कर्षांची आज आत्यंतिक आवश्यकता आहे. माध्यमिक शिक्षणाचे क्षेत्र प्राथमिक लष्करी शिक्षणाने अधिक व्यापक आणि जीवनानुगामी करणे शक्य आहे याची नोंद निष्कर्ष काढताना घेणे अधिक योग्य झाले असते.

या सूचनांचा गांधी स्मारक निधीची मुंबई शाखा दखल घेऊन विचार करील अशी आशा आहे.

— जवाहर मुथा

(२)

### म. म. मिराशींना प्रत्युत्तर

' अशोक ते कालिदास ' या माझ्या ग्रंथावर ' नवभारत ' मासिकाच्या ऑगस्टच्या अंकात म. म. मिराशी यांनी विपर्यासपूर्ण टीका केली आहे.

आपल्या टीकेत म. म. मिराशींनी म्हटले आहे की मी कल्हणाला आधुनिक संशोधकांचा पूर्वावतार म्हणून गौरविले आहे. पण मी कल्हणावर पुढील टीका केली आहे : " अर्वाचीन चिकित्सकांचा पूर्वावतारच अशा कल्हणाने असल्या स्थळी स्वतःची बुद्धि न चालविता केवळ प्राचीन परंपरा संपूर्ण संरक्षिली असती तर त्याचे आपल्यावर अनंत उपकार झाले असते. पण ' अति शाहणा त्याचा बैल रिकामा ' या न्यायाने कल्हणासारख्या अर्धवट चिकित्सकांनी आपला प्राचीन इतिहास कसा लोपवून टाकला, इतकेच काय ते वरील श्लोकांवरून कळून येते. " कल्हणाचा मी गौरव केला आहे का अधिक्षेप केला आहे, याची यावरून वाचकाना पुरेशी कल्पना येईल.








माझ्या ग्रंथाच्या २०७ पानावर मी लिहिले आहे : "मालविकाग्निमित्राच्या चौथ्या अंकात कालिदासाने पिंगल वानराचा केलेला उपयोग सदोष असल्याचे सांगून प्रो. झाला स्वस्थ बसले. पण कालिदासाचे गोत्र कपि असल्याने त्याने या वानराचा उपयोग केला आहे, का कवीच्या व्यवसायासह तो कपीचाही व्यवसाय थोडाफार करीत असल्याने त्याला या संकटप्रसंगी कपीची आठवण झाली, याचा त्यानी उलगडा केला नाही." परानुकरण करून कवितारचना करणाऱ्या कवीला कपि म्हणतात. पण हा संकेत ध्यानात न घेता म. म. मिराशी लिहितात—'कालिदासाचे गोत्र कपि होते आणि तो वानरपालनाचा व्यवसाय करीत होता, ही अत्यंत महत्वाची माहिती करंदीकरांना कोणत्या कर्णपिशाचाकडून कळली, माहीत नाही!' मला एवढेच सांगावेसे वाटते की 'परिहासविजल्पितं सखे, परमार्थेन न गृह्यतां वचः ॥'

शाकुंतलाच्या पाचव्या अंकावर मी केलेल्या टीकेला उत्तर देताना म. म. मिराशी लिहितात की, वास्तविक पाहता शाकुंतलाच्या पाचव्या अंकात कालिदासाची चूक झाली नसून करंदीकरांनाच दुर्वासाच्या शापाचा प्रभाव समजला नाही, असे म्हटले पाहिजे. कारण या शापाने दुष्यंताला केवळ शकुंतलेची विस्मृति झाली नसून कण्वाश्रमातील सर्वच घटना आठवेनाशा झाल्या, असा कालिदासाचा अभिप्राय आहे. पण ही त्यांची मल्लिनाथी स्वतः दुर्वासाच्या शापाशी सर्वस्वी विसंगत आहे. तो एवढेच म्हणतो की मी तपोधन समोर आलो असताना वल्लभाच्या ध्यानात निमग्न होऊन तू माझ्याकडे दुर्लक्ष करीत आहेस, त्या अर्थी पूर्वी दिलेली वचने विसरणाऱ्या मद्यप्याप्रमाणे त्याला आठवण दिली तरी तुझे स्मरण होणार नाही. तेव्हा ग्रीक नाटकातील मद्यप्यांच्या विस्मरणाइतकेच विस्मरण दुर्वासशापामुळे दुष्यंताला झाले होते. दुर्वासाने असा शाप दिला नव्हता की तुझ्यासह तुझ्या माहेरच्या साऱ्या माणसांना तो विसरून जाईल. शकुंतलेशी संबद्ध असलेल्या साऱ्याच व्यक्तींचे राजाला विस्मरण झाले असते तर कण्व कोण याचीच त्याला प्रथम विस्मृति झाली असती. याकरिताच मी माझ्या ग्रंथात लिहिले आहे–'जो राजा एकट्या सारथ्यासह कण्वाश्रमात म. म. मिराशींच्या मताप्रमाणे तीन चार आठवडे राहिला होता, त्याला शार्ङ्गरव आणि शारद्वत हे कण्वशिष्यही अपरिचित असावेत आणि षण्मासांपूर्वी आपण त्यांच्या आश्रमात अतिथि म्हणून राहिलो होतो, याची शुद्ध नसावी, ही गोष्ट अगदीच असंभवनीय आणि त्यामुळेच हास्यास्पद वाटते.'

अल्पवयीन मुलींना संन्यासदीक्षा देऊन मठात कोंडणे हा सामाजिक अपराध असून तो घडल्याचे उघडकीस आले असता समाजात साहजिकपणेच प्रक्षोभ होतो. १९५१ च्या मे मध्ये एका अल्पवयी मुलीला जैनांनी श्राविका बनवून मठात ठेवल्याचे वृत्त कानी येताच कर्णावतीच्या संतप्त तरुणांनी त्या मठाची दारे फोडून तिला तेथून सोडविण्याचा प्रयत्न केला होता. हे आधुनिक उदाहरण लक्षात घेतले म्हणजे अल्पवयीन श्राविका पाहून प्राचीन काळीही कसा प्रक्षोभ उत्पन्न होत असेल, याची वाचकांना कल्पना येईल. कालकाचार्यकथानकाच्या काही परंपरा कालकानेच सरस्वतीला दीक्षा दिली होती, असे सागतात. इतर काही परंपरा त्याच्या गुरूनेच तिला दीक्षा दिली होती, असे सांगतात. दीक्षा कोणीही दिली असली तरी अल्पवयीन सरस्वतीवर तो अत्याचारच होता, याविषयी शंका नाही. त्यामुळे तिची श्राविकाजीवनातून मुक्तता करून दर्पण राजाने धर्मानुसरणच केले होते. भगिनीच्या मुक्ततेमुळे आणि विवाहामुळे sister–complese झालेल्या कालकाला वेड लागलेले पाहून राजाने त्याला वेगळे शासन केले नसेल. "पुढे सरस्वती गर्दभिल्लाची पट्टराणी झाली आणि तिला विक्रमादित्य हा पुत्र झाला, असे विधान

यत्किंचित्ही पुरावा नसता करंदीकर ठासून करतात, यावरून त्यांची चिकित्सक वृत्ति उत्तम रीतीने दिसून येते." या व्याजस्तुतीला उत्तर देण्याचे काम स्वतः म. म. मिराशींनीच अतिशय सोपे करून ठेविले आहे. ते स्वतःच पुढे लिहितात : 'कालकाचार्याने गर्दभिल्लाचा उच्छेद केल्यावर सरस्वतीला पुन्हा श्राविका कले असे स्पष्ट विधान अनेक जैन ग्रंथात केले आहे. तेव्हा सरस्वती गर्दभिल्लाची पट्टराणी म्हणून राहिली नसून पुनरपि श्राविका झाली होती, हे स्पष्ट आहे.' म. म. मिराशींच्या या अवतरणावरून पतिनिधनानंतर पुनरपि श्राविका झालेली सरस्वती तत्पूर्वी पट्टराणी म्हणून गर्दभिल्ल राजाकडे रहात होती, हे उघड आहे. विक्रमादित्य हा गर्दभिल्ल राजाचा पुत्र असल्याचे स्वतः म. म. मिराशींनीच विक्रमस्मृति ग्रंथात ७६ पानावर लिहून ठेविले आहे : "पुढे काही वर्षांनी गर्दभिल्लाचा मुलगा विक्रमादित्य याने मोठ्या प्रयासाने शक राजांचा पराभव करून उज्जयिनीस पुन्हा आपली गादी स्थापली. आपल्या जन्मभूमीस पारतंत्र्यातून सोडविल्याची खूण म्हणून खिस्तपूर्ण ५८ या वर्षी विक्रमादित्याने आपल्या नावाने एक कालही चालू केला, तोच सध्या प्रचलित असलेला विक्रमसंवत् होय."

१९४६ च्या अंती प्रसिद्ध झालेल्या 'विक्रमस्मति' ग्रंथाच्या लेखकात माझ्यासह म. म. मिराशींचाही समावेश झाला होता. त्यावेळी माझ्याप्रमाणेच विक्रमादित्याला त्यानी पुढील कृतज्ञतापूर्ण शब्दात आदरांजलि वाहिली होती. "आजही विक्रमादित्याचे नाव घेतले असता त्याचे शौर्य, दातृत्व, चातुर्य, प्रजावात्सल्य, न्यायीपणा इत्यादि असामान्य गुण दृष्टीसमोर येतात. पण त्या सर्वांपेक्षा परकी शक लोकांच्या अनन्वित छळापासून त्याने स्वदेशाला मुक्त केले, या जाणिवेनेच आज शेकडो वर्षे भारतवासीयांना त्याच्याविषयी कृतज्ञता वाटत आली आहे, आणि त्या कृतज्ञतेतच त्या पुण्यश्लोक नृपतीविषयींच्या भारतीयांच्या असामान्य भक्तीचे बीज आहे." त्यांचा आजचा नवा अवतार पाहिला म्हणजे 'राधेय अन्य तूं तो अन्यचि जाणो पळोनि जो गेला,' या मोरोपंतांच्या उक्तीचे स्मरण झाल्यावाचून रहात नाही. म. म. मिराशींच्या मध्ये हें जे परिवर्तन झाले, त्याचे एक महत्वाचे कारण म्हणजे त्याच ग्रंथात विक्रमाच्या मातेचे नाव सरस्वती होते, असा मी मांडलेला अभिनव सिद्धांत होय. कारण वर दाखवून दिल्याप्रमाणे कालकाचार्यभगिनीच्या उदरी विक्रमाचा जन्म झाल्याचे सिद्ध झाल्यास 'स्पृहावती वस्तुषु केषु मागधी' किंवा 'नदीमिवांतःसलिलां सरस्वतीम्' अशा वचनातून कालिदासाने राजमातेचा उल्लेख करण्याची संधि साधल्याचे उघडकीस येऊन कालिदासाचा विक्रम कोण या प्रश्नाचा निर्णय लागतो. उर्वशीने ज्या लक्ष्मीस्वयंवरात लक्ष्मीची भूमिका केली, ते नाटकही सरस्वतीकृत असल्याचा कालिदासाने हेतुतः उल्लेख केला आहे. त्यावरून विक्रममातेला नाटकांचीही गोडी असल्याचे कळून येते. मग म. म. मिराशींच्या संशोधनाचा मेरुमणि जो 'कालिदास' त्या ग्रंथाला कोण पुसणार ?

'अथेन्सच्या कवींचा कालिदासावरील प्रभाव' हा लेख पाच वर्षांपूर्वी प्रथम इंग्रजीत प्रसिद्ध झाला, तेव्हाच मी तो म. म. मिराशींच्याकडे पाठविला होता. पण त्यावेळी त्यांनी काहीच टीका केली नाही आणि आता तरी काय, ते माझ्यावर केवळ परधार्जिणेपणाचा आरोप करीत आहेत. या आरोपावरूनच सत्यार्थकथनात निश्चल राहण्याचा त्यांच्या टीकेतील उपदेश मी कसा पूर्वीच आचरणात आणला आहे, हे वाचकांच्या ध्यानात येईल.

कालिदासाच्या ग्रंथातून त्याचे आराध्यदैवत जे शिव, त्यांच्या गणेश नामक पुत्राचा उल्लेख नाही, यावरूनही त्याचा काळ कसा निश्चित ठरतो, हे मी प्रथम दाखवून दिले आहे आणि ज्या अश्वघोषाचे कालिदासाने अनुकरण केले, असे आमचे परधार्जिणे आचार्य परानुकरणाने प्रतिपादीत आहेत, त्या अश्व-










घोषाने द्विरदानन, वारणलंबकर्ण, लंबोदर, अशा देवाने बुद्धावर आक्रमण केल्याचे वर्णन केले असल्याने तो कालिदासोत्तर असल्याचे मी सिद्ध केले आहे. गुप्तकाली गणेशोपासना लोकप्रिय झाली होती, असे भारतीय विद्याभवनाच्या मौर्यकुषाण साम्राज्याच्या इतिहासाच्या खंडावरून दिसून येते. या काळातील गणेशोपासनेची चर्चा करून त्या इतिहासकारांनी म्हटले आहे. 'His real popularity came slightly later' याचा अर्थ असा होतो की कुषाण काळातच गणेशोपासना चालू झाली होती आणि गुप्तकालात ती चांगलीच लोकप्रिय झाली होती. गुप्तकालीन शिल्पामध्ये गणेशोपासनेचे पुरावे कोठे कोठे सापडतात, हे डॉ. पाटील यानीही गुप्तकालीन शिल्पावरील त्यांच्या प्रबंधात दाखवून दिले आहे. तेव्हा अज्ञानाच्या नंदनवनात निवास करणाऱ्या विश्वविद्यालयातील आचार्यांच्या व्यतिरिक्त इतर संशोधकांना गुप्तकालात गणेशोपासना प्रचलित होती, ही गोष्ट चांगलीच परिचित झाली आहे. अशा परिस्थितीत कालिदासाला गणेशोपासना अविदित होती आणि अश्वघोषाला ती परिचित होती, या माझ्या संशोधनाचे महत्त्व त्यांना कळू शकेल.

म. म. मिराशींनी माझ्यावर शिवीगाळ करण्याचा आरोप केला असला तरी तोही निराधार आहे. डॉ. आळतेकरांचा मी अज्ञही नाहीत आणि तज्ज्ञही नाहीत अशा कोटीत समावेश केला आहे. मी त्यांना अज्ञ म्हटलेले नाही. माझ्या साऱ्या टीका वाचूनही ते कारणपरत्वे माझ्याकडे येत असत. डॉ. वासुदेवशरण आगरवालही माझ्या परिचयाचे आहेत. त्यांनी, इंग्रजीत ज्यांना स्वीपिंग स्टेटमेंट्स म्हणतात, तसल्या पद्धतीची विधाने करू नयेत, अशी विनंति करताना मी त्या इंग्रजी वाक्संप्रदायाचे मराठी भाषांतरही त्याला जोडले आहे, इतकेच. विश्वविद्यालयातील आचार्य हे, चव्हाण आणि येरवडेकर या माझ्या विधिविशारद मित्रांच्या प्रमाणेच आमच्या करमणुकीचा विषय आहेत, द्वेषाच्या विषय नव्हेत.

— अ. ज. करंदीकर

( ३ )

## गुप्तकालात गजाननाची उपासना प्रचलित होती

'नवभारत' मासिकाच्या ऑगस्ट ६३ च्या अंकात 'कालिदासविषयक बादरायणी संशोधन' हा डॉ. वा. वि. मिराशी यांचा लेख प्रसिद्ध झाला असून त्यात ते लिहितात, 'गुप्तकालीन एकाही लेखात गजाननाचा उल्लेख नाही. तसाच तो कालिदासाच्या ग्रंथात नाही. (पृ. २१)

इ. सनाच्या पाचव्या शतकात गजाननाची उपासना प्रचलित होती याला एक महत्त्वाचा पुरावा म्हणजे 'उदयगिरी' (मध्यप्रदेश पूर्वीच्या ग्वाल्हेर संस्थानातील एक प्राचीन स्थान) येथील क्रमांक ६ च्या गुहेमध्ये खडकावर कोरलेली गणपतीची एक मूर्ति असून ती इ. सनाच्या पाचव्या शतकातली आहे असे ग्वाल्हेर संस्थानच्या पुराणवस्तुसंशोधकखात्याच्या अहवालात नमूद केलेले आहे. सदर मूर्तीचे छायाचित्र व त्याच्याखाली संशोधनखात्याची टीप 'पुरुषार्थ' मासिकाच्या खास गणेश अंकात (शके १८५९) पृ. ३६ वर आहे. ही गोष्ट गुप्तकालात गजाननाची उपासना प्रचलित होती या श्री. करंदीकरांच्या म्हणण्याला दुजोरा देणारी आहे.

अशी जर वस्तुस्थिति आहे तर मग 'कालिदासाच्या ग्रंथात गजाननाचा उल्लेख नसल्याचे कारण गुप्तकालात या देवतेची उपासना प्रचलित नव्हती हा डॉ. महाशयांचा अभिप्राय चुकीचा वाटतो. गुप्तकालीन एकाही लेखात गजाननाचा उल्लेख नसला तरी त्या काळात गजाननाची उपासना चालू होती हे सिद्ध झाल्यावर कालिदासाच्या समग्र ग्रंथात एकदाही चुकूनसुद्धा गणपतीचा उल्लेख येऊ नये ही गोष्ट संशोधकांना विचार करण्यासारखी वाटत नाही काय ? केवळ अभावात्मक प्रमाण ( Argumentum ex Silentio ) म्हणून हा पुरावा बाजूला डावलण्याइतपत अगदी कच्चा नाही. कालिदास हा शिवोपासक होता, त्याने शंकरपुत्र

स्कंद याच्या जन्मावर एक महाकाव्य रचले आहे; तसेच त्याच्या समग्र ग्रंथात अनेक ठिकाणी स्कंदाचा निर्देश आढळत असून उपमा आणि दृष्टान्त देताना शंकरपुत्र स्कंदाचा त्याने पंधरा ठिकाणी उल्लेख केलेला आहे; मात्र दुसरा शंकर पुत्र गजानन हाही तितकाच पराक्रमी व शूर होता. शिवाय विद्येची देवता म्हणूनही याची प्रसिद्धी आहे, कोणत्याही मंगलकार्याचा आरंभ याच्या पूजनाशिवाय होत नाही इतक्या महत्त्वाच्या या शंकरपुत्राचा उल्लेख केव्हाना केव्हा तरी, कोणत्या तरी उपमा दृष्टांताच्या द्वारे कालिदासाने आपल्या काळी प्रसिद्ध असलेल्या या देवतेचा निर्देश आपली तीन नाटके, दोन महाकाव्ये, एक खंडकाव्य व एक लघुखंडकाव्य या सर्वांमध्ये एकदाहिसुद्धा करू नये ही गोष्ट आपल्याकडील भारतीय संशोधकांना चिंतनीय आहे असे वाटत नाही काय ?

— द. धों. वझे

## ( ४ )

### शिळ्या कढीला ऊत कशाला ?

" भारताच्या राष्ट्रीयतेच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीचे सम्यक स्वरूप निदर्शनास आणणारे जे थोडे इतिहास चिंतक आहेत, त्यात फाटक यांची गणना केली पाहिजे. "

असे स्तुतिरूप विधान ज्या प्रा. न. र. फाटकांबद्दल तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यानी केले आहे त्या प्राध्यापकानी तशा प्रकारचे लेख लिहिण्याचे सोडून ' रामदासी वादाचा परिचय ' हे शिळे विषय पुनः का चघळीत बसावे हे समजत नाही. प्रा. न. र. फाटक रामदासी वादाचा परिचय सुबुद्ध महाराष्ट्रीयांना काय करून देणार हे माहीतच आहे. ' समर्थ रामदासानी जन्मभर देवोद्धाराचा प्रयत्न केला, राजकारणाशी त्यांचा काहीच संबंध नाही. " हे त्याचे मत ' राजकारण ', ' महाराष्ट्रधर्म ', ' दीर्घ सूचना ', ' सावधानता ', 'अहर्निशप्रयत्न' ' धूर्तपणा ', ' धकाधकी ', ' **मुख्यसूत्र हाती घ्यावे । करणे ते लोकां करवी करावे । 'कित्येक खलक उगवावे । राजकारणामध्ये ॥' धकाधकीची कामे । तीक्ष्णबुद्धीची वर्मे । भोळ्या भावार्थे संभ्रमे । कैसे घडे ॥** उदंडकरी गुप्तरूपे ॥ भिकाऱ्यासारखा स्वरूपे ॥ मुलुख राखावा आपला । त्या माजी परका देखला । तो पाहिजे बुडविला । अगोदरचि ॥ बहुत लोक मेळवावे । एकविचारे भरावे । कष्टे करून घसरावे । म्लेंच्छावरी ॥ "प्रस्तुत यवनाचे बंड । हिंदू उरला नाही चंड ॥ " 'बुडाला औरंग्यापापी । ' इ. इ. 'गुप्ततेची बंधने' व ' काळाचा विनाश ' यांच्या तावडीतून उरलेले समर्थ रामदासांचे हे विचार पाहिल्यावर " ते इतर संताप्रमाणे नुसते भगवद्भक्त होते" हा प्रा. न. र. फाटकांचा तीस चाळीस वर्षे उराशी बाळगलेला पूर्वग्रहदूषित सिद्धान्त महाराष्ट्रातील सुबुद्ध वाचक मानण्यास कसा तयार होणार ? हा सिद्धान्त प्रा. फाटकांनी आपला आपल्याजवळ खुशाल ठेवावा. पण समर्थभक्तांच्या कुचाळ्या करण्याची हाव आता तरी थोडी आवरून धरावी. निदान दिवंगत सात्विक कर्मवीर कै. नानासाहेब देवासारख्या संबंधी तरी खोचट व कुचकट लिखाण लिहिण्याचा मोह आवरावा पण ज्याअर्थी " रामदासी वादाचा परिचय " ही लेखमाला लिहिण्यास प्रा. न. र. फाटकानी आता लेखणी हातात धरली आहे त्याअर्थी आता कोणीही समर्थभक्त त्यांच्या तावडीतून सुटणार नाही असे दिसते ! जे समर्थभक्त जिवंत आहेत ते फाटकांना उत्तर देऊ शकतील. पण दिवंगत बिचारे काय उत्तर देणार ? वाद तीस चाळीस वर्षांचा जुना आहे. तेव्हा आता बहुतेक समर्थभक्त दिवंगत झाले आहेत आणि मला वाटते म्हणूनच ' नवभारता 'चा उपयोग करण्यास ते उद्युक्त झाले आहेत !

—वा. दा. गाडगीळ

## पुस्तक परिचय —

### ‘लोकशिक्षणकार’ जांभेकर : व्यक्तिमत्त्व व कार्य—

संग्राहक : न. ल. इनामदार; ल. म. सुभेदार. (प्रकाशक : डॉ. भा. ना. गुर्जर, १२ नारायणपेठ, पुणे २, श. १८८५, पाने १४+२२४, किं. ७ रु.)

‘लोकशिक्षणा’चे सुप्रसिद्ध संपादक व आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांचा काल, व्यक्तिमत्त्व व कार्य यांवरील संशोधनपूर्वक लिहिलेल्या त्रिखंडात्मक ग्रंथाचे लेखक श्री. गणेश गंगाधर जांभेकर यांच्या वयाला गेल्या ता. २७ एप्रिल १९६३ रोजी पंचाहत्तरावे वर्ष लागले. त्या निमित्ताने वरील ग्रंथ प्रसिद्ध झाला. या ग्रंथाची निर्मिति व प्रयोजन याविषयी थोडक्यात कल्पना संग्राहकांच्या आरंभी दिलेल्या निवेदनातून सारांशरूपाने उद्धृत केलेल्या पुढील उताऱ्यावरून येऊ शकेल : “श्री. नानासाहेब जांभेकर यांचे महाराष्ट्राच्या वैचारिक व सांस्कृतिक क्षेत्रातील कार्य दृष्टीआड करण्यासारखे खचित नाही. असे असूनही आजकालच्या शिक्षित तरुण पिढीस त्यांची व त्यांच्या लोकसेवेची असावी तशी जाणीव राहिली नाही याचे आम्हास सखेदाश्चर्य वाटे. यास्तव त्यांच्या कार्याचे व व्यक्तिमत्त्वाचे मूल्यमापन करणारा एक लहानसा ग्रंथ प्रसिद्ध करता आल्यास त्यांच्या सेवेची नोंद महाराष्ट्र-वाङ्मयात होईल व होणे इष्ट आहे अशी आमची प्रांजल मनीषा तडीस नेण्याच्या दृष्टीने आम्ही श्री. नानासाहेबांचे इष्टमित्र, सहकारी व चाहते यांच्याकडे श्री. जांभेकराचे व्यक्तिमत्त्व व कार्य यासंबंधी आपले विशिष्ट अनुभव आम्हास प्रांजळपणे लिहून कळवावे (अशा आशयाचे) विनंतिपत्र ३१ मार्च १९६१ ला रवाना केले.” संग्राहकांच्या या विनंतिपत्रानुसार जे सुमारे पन्नासावर लहानमोठे लेख आले ते या प्रस्तुत ग्रंथात समाविष्ट आहेत. या लेखकांत, श्री. जांभेकरांच्या जीवनातील निरनिराळ्या कालखंडातून त्यांनी केलेल्या विविध कार्यांत त्यांचे सहकारी म्हणून त्यांच्याशी ज्यांचा जिव्हाळ्याचा संबंध आला अशा निरनिराळ्या कार्यक्षेत्रातील— वि. सी. सरवटे, वा. म. भावे, कुवलयानन्द, ना. गो. चापेकर, मा. श्री. अणे, बाळाचार्य खुपेरकर, द. वा. पोतदार, श्री. मा. दातार, दे. द. वाडेकर, रंगराव दिवाकर, स. ज. भागवत, श्री. के. क्षीरसागर, ना. ग. जोशी, भ. श्री. पंडित, वा. दा. गोखले, वि. गो. दिघे, प. ल. वैद्य, शं. ग. दाते, ह. वा. देशपांडे, ग. त्र्यं. माडखोलकर इत्यादि—सुप्रसिद्ध व्यक्ती आहेत. विशेष म्हणजे या ग्रंथात आरंभी श्री. जांभेकरांचे बालपणापासूनचे स्नेही (सांगलीचे सेवानिवृत्त न्यायाधीश) श्री. गं. र. भडभडे यांनी जांभेकरांच्या पूर्ववयातील कौटुंबिक व शैक्षणिक जीवनावर एक २४ पानांचा चरित्रलेख लिहिलेला समाविष्ट असून त्यातील तपशील जांभकरांचे पुढील कार्य व व्यक्तित्त्व यांची पार्श्वभूमि म्हणून वाचकांना मोठा उद्बोधक वाटण्यासारखा आहे. शिवाय या ग्रंथाचे मनात भरणारे वैशिष्ट्य हे की, जांभेकरांचे कार्य व व्यक्तिमत्त्व यांच्याविषयी लिहिताना, लेखकांनी केवळ गौरवबुद्धीनेच न लिहिता मोकळेपणाने चिकित्सापूर्वक आपले विचार व्यक्त केले आहेत.

श्री. जांभेकर यानी आपल्या निष्ठावंत, ध्येयशाली, ज्ञानशील व व्यासंगी व्यक्तिमत्त्वाने जे कार्य केले आहे व ज्याचा प्रस्तुत ग्रंथात सर्वच लेखकांनी गौरवपूर्वक निर्देश केला आहे त्या कार्याचे प्रामुख्याने चार भाग किंवा क्षेत्रे आहेत असे म्हणता येईल. ती चार क्षेत्रे अशी : (१) आचार्य बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांचे त्यांनी संशोधनपूर्वक लिहिलेले चरित्र. (२) त्यांनी निष्ठेने ११ वर्षे चालविलेले ‘लोकशिक्षण’ हे मासिक. (३) अमळनेर येथे त्यांनी इतरांच्या सहकार्याने केलेला शिक्षणविषयक उपक्रम आणि (४) शुद्धलेखनविषयक त्यांनी केलेले कार्य.

श्री. जांभेकरांच्या या चतुर्विध कार्यापैकी प्रस्तुत लेखकाच्या दृष्टीने चिरकालिक स्वरूपाची व महत्त्वाची अशी वर निर्देशिल्यांपैकी पहिली दोनच कार्ये म्हणता येतील की ज्यांच्यामुळे जांभेकरांचे नाव मराठी वाङ्मयाच्या इतिहासात चिरकाल टिकून राहील.








त्यातीलही अग्रगण्य, पहिल्या प्रतीचे त्यांचे कार्य म्हणजे आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांचे त्यानी लिहिलेले चरित्र हे होय. हे त्रिखंडात्मक चरित्र अस्सल साधन-सामग्रीसह सादर करून, महाराष्ट्रातीलच नव्हे तर भारतातील एका उपेक्षित मानकऱ्याला त्याचे हक्काचे मानाचे स्थान प्राप्त करून देण्यात जांभेकरांच्या अंगचे संशोधकत्व, पांडित्य, लेखनकौशल्य, संघटनाचातुर्य, धडाडी इत्यादि गुण प्रकर्षाने प्रकट झाले आहेत. त्यांच्या या गुणांचे बाळशास्त्री यांच्या चरित्रग्रंथाखेरीज आणखी एक झगझगीत दृश्यफळ म्हणजे मुंबई विद्यापीठाने गेल्या वर्षापासून आचार्य बाळगंगाधर-शास्त्री जांभेकर यांच्या नावाने स्थापन केलेले एक स्वतंत्र गणितविद्यासन ( Chair ) हे होय. जांभेकर बाळशास्त्र्यांचे नुसते ऐतिहासिक महत्त्वाचे चरित्र लिहूनच थांबले नाहीत, तर मुंबईच्या कॉलेज-मधील गणिताचे पहिले महाराष्ट्रीय वा भारतीय प्राध्यापक, दादाभाई नौरोजींचे गुरु व इतर प्राच्यविद्या-संशोधन, समाजसुधारणा इत्यादि क्षेत्रात त्या काळी अग्रेसरत्व पावलेले बाळशास्त्री यांच्या नावाने मुंबई विद्यापीठाने एका गणिताच्या विद्यासनाची ( chair ची ) स्थापना करावी हा आपला संकल्प मुंबईविद्यापीठाच्या अधिकारी मंडळांना पटवून तो त्यांनी प्रत्यक्ष कार्यवाहीत आणवला. या त्यांच्या प्रयत्नांना मिळालेले यश म्हणजे त्यांच्या कर्तृत्वाचा कळस समजावयास हरकत नाही. या यशामुळे साहजिकच जांभेकरांना कृतार्थता वाटत असल्यास नवल नाही, व तशी त्यांनी धन्यवादपूर्वक प्रकट केलेली आपली कृतार्थ भावना प्रस्तुत पुस्तकात एका परिशिष्टात ( पान १८६–१८७ ) संग्राहकांनी समाविष्ट केलेली बघून समाधान वाटते.

मराठी वाङ्मयेतिहासात जांभेकरांचे नांव कायमचे राहील असे त्यांचे दुसरे कार्य म्हणजे त्यांनी जनार्दन विनायक ओक यांचे ‘ लोकशिक्षण ’ पुनरुज्जीवित करून, त्याचे भरदार स्वरूपात १९२८ ते १९४१ या कालावधीत ११ वर्षे केलेले संपादन व संचालन. जांभेकरांचे ‘लोकशिक्षण’ हे त्या काळीं असे एकमेव मराठी मासिक होते की ज्यात राजकारण, समाजकारण, साहित्य, संस्कृति या विषयावर प्रचलित घटनांच्या निमित्ताने त्यामागील तात्त्विक भूमिका स्वतंत्रपणे विशद करणारे विचारवंतांचे लेख येत असत. त्या काळी मासिकांची फारशी स्पर्धा नव्हती. विचारवंत लेखक लिहावयासही उन्मुख असत. पण त्यांना विषय देऊन लिहावयास प्रवृत्त करणे, त्यांच्याकडून आलेले लेख अत्यंत शुद्ध, सुबक स्वरूपात प्रकाशित करून वाचकांपुढे आणणे इत्यादि कामे जांभेकरांनी करून दाखविली. त्यांच्या या संघटनाचतुर संपादनामुळे ‘ लोकशिक्षणा’च्या ११ वर्षांच्या हयातीत प्रसिद्ध झालेले वाङ्मय ( –प्रस्तुत ग्रंथाच्या शेवटी परिशिष्टातून या ११ वर्षांत ‘ लोकशिक्षणा’त आलेल्या महत्त्वाच्या लेखांची यादी दिली आहे– ) राजकारण, साहित्य, इतिहास इत्यादि क्षेत्रातील अभ्यासकांना नेहमीच संदर्भोपयोगी राहील इतक्या योग्यतेचे आहे. ‘लोकशिक्षण’ मासिकाबरोबरच अर्थशास्त्र, समाजशास्त्र इत्यादि विषयांवर तज्ज्ञ लेखकांकडून जांभेकरांनी छोटी छोटी पुस्तके लिहवून घेऊन ती त्यानी ‘ लोकशिक्षण–लघुग्रंथमाला ’ म्हणून प्रकाशित केली. विशेष म्हणजे ‘ लोकशिक्षणा’ची लेखसंपादनविषयक तशीच आर्थिक अशा दोन्हीही बाजूंची मुख्य धुरा जांभेकरांनाच उचलावी लागली. ‘ लोकशिक्षण ’ १९२८ सालापासून चार वर्षे एकट्याने स्वार्थत्यागपूर्वक चालविल्यानंतर त्यांची आर्थिक बाजू सावरण्याकरिता त्यानी ‘ लोकशिक्षणमंडळ ’ नावाची लिमिटेड कंपनी काढली. पण त्या योगानेही आर्थिक स्थिति सुधारली नाही व शेवटी १९४१ साली तनमनधन खर्च करून स्वार्थत्यागपूर्वक व निष्ठेने चालविलेला ‘लोकशिक्षणा’चा हा उपक्रम जांभेकरांना खेदपूर्वक बंद करावा लागला.

खानदेशात अमळनेर येथे जांभेकरानी १९२१-२३ राष्ट्रीय शिक्षणाच्या आखणीत व प्रयोगात पुढाकार घेऊन जे काही कार्य करून दाखविले ते परकीय सत्तेविरुद्ध चाललेल्या राष्ट्रीय आंदोलनातील एक टप्पा म्हणून ऐतिहासिक महत्त्वाचे असले तरी त्याला चिरकालिक महत्त्व किती याविषयी शंकाच आहे. जांभेकर यांनी १९१६ साली अमळनेर येथे जाऊन

आपल्या सहकाऱ्यांनिशी जो शिक्षणक्रम १९२१ पर्यंत आखला व कार्यवाहीत आणला तो त्या वेळच्या सरकारी चाकोरीतील होता. १९२१ साली तर अमळनेरला युनिव्हर्सिटी व सरकार याना मान्य असे आर्ट्स कॉलेज निघण्याची सिद्धता त्यांच्याच पुढाकाराने पूर्ण होत आली होती. इतक्यात गांधींच्या असहकारितेच्या आंदोलनाचे निमित्त घेऊन, खानदेशशिक्षणमंडळाने जांभेकरादींच्या प्रेरणेने आपल्या शैक्षणिक उपक्रमाचा मोहरा बदलून तो राष्ट्रीय-शिक्षणाभिमुख बनवला. परंतु हे स्थित्यंतर अल्पजीवी ठरून १९२३ साली खा. शि. मंडळाने पुन्हा आपली सरकारमान्य शिक्षणक्रमाची चाकोरी स्वीकारली. खानदेशशिक्षणमंडळाच्या इतिहासातील जांभेकराच्या पुढाकाराने अस्तित्वात आलेला राष्ट्रीय शिक्षणाच्या उपक्रमाचा हा सुमारे दोन वर्षांचा टप्पा उज्ज्वल देशभक्तीने प्रेरित होऊन उजळलेला वाटत असला, तरी आज शांत बुद्धीने त्याचे सिंहावलोकन करीत असता, हा राष्ट्रीय शिक्षणाचा उपक्रम त्या संस्थेच्या व एकंदरीत त्या भागातील उच्च शिक्षणाच्या इतिहासाच्या दृष्टीने अदूरदर्शी ठरला असावा असे वाटते. जांभेकर व त्यांचे सहकारी यांनी पूर्वी योजिल्याप्रमाणे १९२१ साली युनिव्हर्सिटी व सरकार यांना मान्य असे कॉलेज काढून पुढचा क्षुण्ण मार्ग आक्रमिला असता तर, उच्च शिक्षणाचा पाया अमळनेरला व तद्द्वारा खानदेशात जो पुढे १९४५ साली रोवला गेला त्या आधी दोन तपे रोवला जाऊन, त्यांच्यासारख्या व्यापक, ध्येयवादी दृष्टीच्या विद्वान् अध्यापकांच्या सहकार्याने तो अधिक सुदृढ झाला असता. राष्ट्रीय शिक्षणाचे प्रयोग करावयाचे तर ते आरंभापासून—ते स्पष्ट उद्दिष्ट ठेवून—जसे प्रो. विजापूरकरांनी केले तसे करावयास पाहिजेत, आधीच सरकारमान्य चाकोरीतून जावयाच्या उद्देशाने ज्या खा. शि. मंडळासारख्या संस्थेने आपली सर्व द्रव्य-साधन-सामग्री जमविली त्या संस्थेचेच, तात्कालिक आंदोलनातून उत्पन्न होणाऱ्या ऊर्मीला साद देऊन, स्वरूप पालटून टाकणे हे अनेक दृष्टींनी हानिकारक होईल असे म्हणणारे एक राष्ट्रीय वृत्तीचेच विचारवंत त्यावेळच्या आजीवसदस्यमंडळात होते व संस्थेचे स्वरूप पालटत आहे हे बघून १९२१ च्या सुमारास ते संस्था सोडून गेले व पुढे त्यांनी राष्ट्रीय आंदोलनातून वेळोवेळी भाग घेतला. त्या विचारवंतांचा दृष्टिकोण या प्रकरणी सयुक्तिक वाटतो.

अलीकडील मराठी शुद्धलेखनविषयक चळवळीत जांभेकरांनी हिरीरीने भाग घेतला. त्याचा ऐतिहासिक आढावा घेणारा सुमारे २० पानांचा एक लेख परिशिष्ट २ म्हणून प्रस्तुत ग्रंथात समाविष्ट केला आहे. मराठी साहित्य-महामंडळाची मराठी शुद्धलेखननियमावली, तिला मिळत असणारी सरकारी व इतरत्र मान्यता यांचा विचार करता, जांभेकरांच्या शुद्धलेखनविषयक मतप्रतिपादनाला किती चिरकालिक महत्त्व राहील याबद्दल शंका वाटते. शुद्धलेखनविषयक इतिहासातील एक टप्पा म्हणूनच तात्कालिक महत्त्व त्याला आहे, अशी चिन्हे दिसत आहेत.

प्रस्तुत ग्रंथाच्या निमित्ताने जांभेकरांच्या वैशिष्ट्यपूर्ण कार्याचे वर संक्षिप्तपणे समालोचन केले आहे. प्रस्तुत ग्रंथात त्यांच्या कार्याबरोबर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचेही दर्शन लेखकांच्या लेखांतून वाचकाला झाल्याशिवाय रहात नाही. जांभेकरांच्या ठिकाणची स्वकार्याबद्दलची निष्ठा, चिकाटी, त्यांची त्यागी, निरलस वृत्ति, तपशीलाबद्दलचा काटेकोरपणा, विद्वत्ता इत्यादि गुणांचा जसा सर्व लेखकांनी उल्लेख केला आहे तसा काहींनी प्रांजळपणे त्यांच्या या गुणांचे काही बाबतीत दिसून येणारे अतिरेकी स्वरूप म्हणजे आग्रहीपणा, आत्मकेन्द्रित्व सहकाऱ्यांशी जुळते घेण्याकडे अप्रवृत्ति, माणसाला आपल्याकार्याकरिता राबवून घेण्याची वृत्ति इत्यादि प्रवृत्तींचाही उल्लेख केला आहे. परंतु जांभेकरांच्या व्यक्तिमत्त्वांतील हे बोचणारे दोष त्यांच्या त्यागी, ध्येयवादी जीवनाचा व त्यांनी केलेल्या विविध कार्यांचा विचार केल्यास उपेक्षणीयच होत असेच कोणीही सुज्ञ वाचक म्हणेल.

— वि. म. बेडेकर










# सार-संकलन

## आर्थिक साहाय्याबाबत ब्रिटिश दृष्टिकोन

मागस राष्ट्रांना आर्थिक साहाय्य देण्याचे कार्य पाश्चात्य राष्ट्रे गेली कित्येक वर्षे करीत आहेत. या कार्यात आर्थिक संपन्नतेमुळे अमेरिकेने पुढाकार घेणे स्वाभाविक असले तरी त्यात निरनिराळ्या युरोपीय राष्ट्रांचाही हातभार लागलेला आहे. मागस राष्ट्रां-प्रमाणेच मदत देणाऱ्या राष्ट्रांतही याबाबत निरनि-राळ्या प्रतिक्रिया आढळतात. ब्रिटिश सरकारने या प्रश्नासंबंधी नुकताच एक अहवाल प्रसिद्ध केला असून लंडनच्या 'टाइम्स' पत्राने दि. २६ सप्टेंबरच्या अंकात तत्संबंधी अभिप्राय व्यक्त केला आहे. त्याचा सारांश–

"पाश्चात्य राष्ट्रांपुढील एका अत्यंत गुंतागुंतीच्या प्रश्नाबाबत हा अहवाल म्हणजे गेल्या तीन वर्षांत प्रथमच होणारे अधिकृत विस्तृत स्पष्टीकरण होय. त्यात वास्तववादी दृष्टिकोण घेण्यात आला असल्याने ते स्वागतार्ह आहे. दहा वर्षामागे पुष्कळच आशा-वाद प्रकट केला जाई. आता या साहाय्याच्या योगाने गरजू राष्ट्रांना नजीकच्या भविष्यात आपल्या पायावर उभे राहता येईल असे वाटेनासे झाले आहे." ऐति-हासिक दृष्टिकोनातून मदतीचा हा कालखंड तात्पुरता वाटला तरी त्यामुळे तो अल्पकालीन ठरेल असे वाटत नाही; तो संपत आला आहे असे तर मुळीच नाही." असे अहवालात म्हटले आहे. यामुळेच या प्रश्नाचे यथार्थ आकलन महत्त्वाचे आहे. भारत व अन्य विकसनशील राष्ट्रे आता कुठे आपले अन्नधान्योत्पादन प्रजावाढीच्या मानाने काहीसे समाधानकारक ठेऊ शकत आहेत. उलट पाश्चात्य औद्योगिक राष्ट्रातील राहाणीचे मान मात्र झपाट्याने सुधारत आहे. यामुळे 'श्रीमंत' व 'गरीब' राष्ट्रातील अंतर वाढलेच आहे. मानवतेच्या वा राजकारणाच्या वा दोन्हीही दृष्टीने ही परिस्थिती फारशी समाधानकारक नव्हे.

पाश्चात्य राष्ट्रे वा ब्रिटन याजकडून दिल्या जाणाऱ्या मदतीचे प्रमाण मामुली नाही. पाश्चात्य राष्ट्रांकरवी होणारी मदत दरवर्षी सुमारे ३०० कोटी पौंडाची आहे. यातील एक तृतीयांश मदत खाजगी स्वरूपाची आहे. उरलेल्या २०० कोटींपैकी निम्याहून थोडीशी अधिकच मदत अमेरिकेकडून दिली जाते. ब्रिटनमधील आर्थिक परिस्थिती काहीशी मंदावली असताना व परकीय चलनविषयक अडचणी असताना ब्रिटननेही आपला महत्त्वाचा वाटा उचलला आहे. सुमारे ३० कोटी खाजगी भांडवल व १८ ते २० कोटी इतके सरकारी साहाय्य ब्रिटनकरवी चालू वर्षात दिले जाईल. पाचसहा वर्षांपूर्वीच्या मानाने ही रक्कम जवळजवळ दुप्पट झाली आहे. मदतीच्या अटीही काहीशा सौम्य करण्यात ब्रिटनने पुढाकार घेतला आहे. अशा प्रकारे पाश्चात्य राष्ट्रांचा हा उपक्रम मोठा असला तरी त्याच्या तात्का-लिक परिणामाबद्दल मात्र काहीसे गोंधळलेले विचारच आढळतात. पुढारलेली औद्योगिक राष्ट्रे मदत का कर-तात ? शीतयुद्धाचाच हा एक भाग आहे काय ? की हे सर्व इतरांच्या हितासाठी परोपकारबुद्धीनेच चालले आहे ? की आपला निर्यात व्यापार वाढविण्याचा हा एक मार्ग आहे ? कोणत्याही राष्ट्राला आपण आपल्या हितसंबंधाचा मुळीच विचार करीत नाही असे प्रामा-णिकपणे म्हणता यावयाचे नाही. हा उपक्रम कदाचित आर्थिक व राजकीय हेतूनी प्रेरित होऊन सुरू करण्यात आला असेलही. पण तो चालू राहाण्यास त्याहून उच्च ध्येयवादही जबाबदार आहेच. आर्थिक मदतीच्या कल्पनेचे विसाव्या शतकातील खरे महत्त्व आर्थिक नसून नैतिक आहे" असे अर्थमंत्र्यांचे रास्त म्हणणे आहे.

तथापि उपलब्ध होणाऱ्या मदतीचा उपयोग सर्वो-त्कृष्ट मार्गाने कसा होऊ शकेल हे जाणण्याची गरज मात्र यामुळे नाहीशी होत नाही. ओ. इ. सि. डी. च्या पॅरिसमधील विकास सहाय्य समितीच्या योगाने मदतीच्या योजनात अधिक सुसूत्रता आणणे आता शक्य झाले आहे. तथापि हेही पुरेसे नाही. कित्येक विकसनशील राष्ट्रे एकाददुसऱ्या वस्तूच्या उत्पादनावरच अवलंबून असलेली आढळतात. ही परिस्थिती बदल-ण्यासाठी त्यांच्या आर्थिक जीवनात महत्त्वाचे रचनात्मक बदल होणे जरूर आहे. त्याचप्रमाणे पुढार-








सुधारलेल्या राष्ट्रांनीही आपापल्या बाजारपेठातून मागस राष्ट्रांतील कच्च्या व तयार मालाला अधिकाधिक वाव देणे आवश्यक आहे. आपला माल पाश्चात्य बाजारपेठातून विकणे शक्य झाल्यावाचून आर्थिक सहाय्याचा या राष्ट्रांना फारसा उपयोग होऊ शकणार नाही.

## काही महत्त्वाच्या व्यापारी हालचाली :

दि० २८ सप्टेंबरच्या अंकात लंडनच्या "इकॉनॉमिस्ट" पत्राने अमेरिका- रशिया व अमेरिका- चीन याजमधील व्यापाराबद्दल एक महत्त्वाचे स्फुट लिहिले आहे.

"या आठवड्यात युरोपीय सामायिक बाजारपेठेतील आपले जुने स्नेही व व्यापारातील भागीदार यांच्याशी अमेरिकेचा व्यापारी कलह होण्याची चिन्हे दिसू लागली. त्याबरोबर काही उद्योगपती, शेतकरी व कायदे मंडळाचे सभासद यांनी सोविएट व त्यांची अंकित राष्ट्रे या अत्यंत नव्याने झालेल्या मित्रांशी व्यापार करण्याबाबतच्या निर्बंधांचा फेरविचार करण्याच्या मागणीस आरंभ केला आहे. कॅनडा रशियाला ५० कोटी डॉलर गहू विकणार आहे. ही बातमी येताच अमरिकेतील मध्यपश्चिम भागात अस्वस्थता निर्माण झाली. कारण येथेही शेतीचे भरपूर अतिरिक्त उत्पादन पडून आहे. सोविएट खरेदी करीत असलेल्या कॅनडातील गव्हाचा काही भाग क्यूबासाठी आहे याचाही या प्रतिक्रियेवर फारसा परिणाम झाला नाही. अध्यक्षांनी निर्यातीच्या प्रश्नाबाबत बोलावलेल्या परिषदेत काही व्यापाऱ्यांनी सोविएटशी करावयाच्या व्यापारावरील निर्बंध कमी केल्यास निर्यात वाढेल व अमेरिकेच्या परदेशी व्यापारातील तूट कमी होईल असे सुचविण्यापर्यंत मजल गाठली !

केनेडींचे या बाबतचे मुळातील धोरण उदारहेतूंनी प्रेरित झालेले होते. पण अमेरिकन काँग्रेसचा त्याला विरोध होता. तथापि आता पूर्व युरोपातील दुष्काळामुळे आजच्या आंतरराष्ट्रीय परिस्थितीचा पुरेपूर फायदा घेऊन निर्यात वाढवण्याचा विचार पुनः डोके वर काढू लागला आहे. काँग्रेसच्या दोन समित्या हा प्रश्न काळजीपूर्वक तपासीत आहेत. जागतिक किंमती विचारात घेऊन निर्यात होणाऱ्या गव्हावर आर्थिक सहाय्य दिले जाते. दोन वर्षापूर्वी या सहाय्याचा शत्रुत्व दर्शविणाऱ्या राष्ट्रांना फायदा मिळता कामा नये ही भूमिका काँग्रेसने घेतली होती तेव्हा अध्यक्षांनी तिला विरोध दर्शविला नाही. आतापर्यंत या बाबतीत फक्त पोलंड व युगोस्लाविया या दोनच कम्युनिस्ट राष्ट्रांचा अपवाद केला गेला आहे. सोविएटला गव्हाची डॉलरची किंमत व ती देखील डॉलरच्या किंवा सोन्याच्या रूपाने द्यावयास पुष्कळच धडपड करावी लागेल.

सोविएट गटांतील ( युगोस्लाविया व्यतिरिक्त ) सर्व राष्ट्रांची मिळून गतवर्षी फक्त साडेबारा कोटींचीच विक्री झाली असा व्यापारी अंदाज आहे. उलट इतर सर्व पाश्चात्य राष्ट्रांची विक्री सुमारे ५०० कोटी डॉलरची होती. तथापि हे प्रमाण वाढविणे वाटते तितके सोपे नाही. रशियाचे आवडीचे तत्र म्हणजे दोन राष्ट्रातील व्यापारी कराराचे. असा करार करायला अमेरिकेला हवा असलेला फर किंवा एकाददुसरा खास पदार्थ याखेरीज मालच रशियाजवळ नाही. उलट रशियाचे लष्करी सामर्थ्य वाढेल असा कोणताही माल त्याला विकण्याची अमेरिकेची तयारी नाही.

औद्योगिक उत्पादन विकायचे म्हटल्यास उधारीचा प्रश्न उद्भवेल. जॉन्सन कायद्याप्रमाणे अमेरिकेचे कर्ज फेडण्याबाबत असमर्थ ठरलेल्या कोणत्याही राष्ट्राला सहा महिन्याहून अधिक कर्ज देता येत नाही. सोविएटने अजूनही आपला उधार-उसनवारीचा हिशेब चुकवलेला नाही. जॉन्सन कायद्यात दुरुस्ती करणे किंवा सोविएटला "मोस्ट-फेवर्ड" राष्ट्र म्हणून वागवणे हे फक्त काँग्रेसच करू शकते. पण काँग्रेसने तर पोलंड व युगोस्लाविया यांना दिलेली ही सवलत देखील शक्यतो लवकर काढून घेण्याचा निर्णय घेतलेला आहे; व तो बदलण्याची तिने अजूनही तयारी दर्शविलेली नाही."

सदर पत्राचा सान्फ्रान्सिस्को येथील प्रतिनिधी लिहितो :

सुमारे तेरा वर्षापूर्वी कोरियन युद्धाच्या वेळी अमेरिकेने चीनला एकाकी बनविण्याचे धोरण स्वीकारले. तेव्हापासून त्याच्या बाबतीत अधिक उदार धोरण स्वीकारण्यात यावे यासाठी प्रयत्न सुरू आहेत. अगदी अलीकडचा प्रयत्न म्हणजे अमेरिकेच्या "चेंबर ऑफ

कॉमर्स" चे अध्यक्ष नैलान यानी लॉस् अँजल्स् येथे केलेले भाषण हा होय. या भाषणात भुकेलेल्यांना अन्नधान्य न पुरवणे हे अनैतिक होय असे सांगून चीनशी मर्यादित स्वरूपात व्यापार सुरू करण्याची आवश्यकता त्यानी प्रतिपादन केली! काही अमेरिकन व्यापाऱ्यांनी या दिशेने सुरू केलेल्या प्रयत्नांचा परिपाक म्हणून हे भाषण होते. चीनबाबतच्या धोरणाच्या फेरविचाराची गरज प्रतिपादन करणारा एक महत्त्वाचा गट अमेरिकेत आहे. गेल्या जुलै महिन्यात या गटाला बरीच प्रसिद्धी मिळाली होती. हाँगकाँगमध्ये चिनी अधिकारी व अमेरिकन व्यापारी यांची एक बैठक त्यानी बोलावली. अमेरिकन शासनातील एक महत्त्वाचे अधिकारी बुंदी यांच्या एका पत्राचा आधार घेऊन त्या उपक्रमाला शासनाचा पाठिंबा आहे असे दर्शविण्याचा प्रयत्नही झाला होता. शासनाने मात्र या वृत्ताचा ताबडतोब इन्कार केला व चीनला मान्यता न देण्याच्या धोरणात कसलाही बदल झाला नसल्याचे स्पष्ट केले.

अधिकृतरीत्या अमेरिकेने चीनला मान्यता दिलेली नाही. सर्वराष्ट्रसंघटनेत चीनला प्रवेश देण्याच्या कल्पनेला पूर्ण विरोध केला आहे. अमेरिकन नागरिक चीनमध्ये प्रवासासाठी जाऊ शकत नाही वा चीनशी व्यापारही करू शकत नाही. तथापि हे कडक धोरण असूनही अमेरिकेच्या पोलंडमधील राजदूताने चीनच्या तेथील राजदूताशी सुमारे दीडशेहून अधिक वेळा गाठीभेटी घेतल्या व लाओससारखे कलह मिटविण्यासाठी अमेरिकन अधिकाऱ्यानी, चीनी अधिकाऱ्याशी प्रत्यक्ष संबंधही प्रस्थापित केले. अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर पॅसिफिक मधील अर्थव्यवस्था निरोगी राखण्यासाठी चीनशी व्यापारी संबंध प्रस्थापित होणे अत्यंत आवश्यक आहे अशी खात्री असलेले कित्येक व्यापारी आहेत. ते अजून उघडपणे हे मत बोलून दाखवीत नाहीत इतकेच!

चीनविषयक धोरणाचा फेरविचार करणे आवश्यक आहे असे म्हणणारा गट हा अजून बव्हंशी शिक्षणक्षेत्रातल्या मंडळींचाच आहे. त्यात काही पत्रकार, कामगारनेते व उद्योगपतीही आहेत. तथापि लक्षावधी डॉलर्सचे औद्योगिक उत्पादन पश्चिम युरोपमधून चीनकडे जात आहे, त्याचप्रमाणे कॅनडा व आस्ट्रेलिया मधून लाखो टन गहूही जात आहे. हे सः निमूटपणे पहावे लागणाऱ्या अमेरिकन व्यापाऱ्यांच्या बऱ्याच मोठ्या गटाचे या संघटनेकडे लक्ष आहे. उदा० ऑरेगॉन या घटकराज्याची १९३४ ते ४१ च्या काळांत सुमारे बारा टक्के निर्यात चीनला होत असे. त्यांना या संघटनेबद्दल कुतूहल असणे स्वाभाविक आहे.

तथापि अधिकाऱ्यांची खाजगी मते काहीही असली तरी अमेरिकन धोरणात नजीकच्या भविष्यात बदल घडून येण्याचा फारसा संभव नाही. किंचित लवचिकपणा आणावा म्हटले तरी ताबडतोब त्याची फॉर्मोसावादी गटाकडून "विश्वासघात" वा "शरणागति" या शब्दानी संभावना होते असा अनुभव आहे! अलीकडे या गटाचे वजन थोडेसे कमी झाले असले तरी उलट दुसरीकडे रशिया–चीन कलहामुळे तूर्त तरी काहीही न करायला एक नवी सबब मिळाली आहे. यामुळे हाँगकाँग मधील चर्चा होऊ शकेल की नाही याबद्दल संशय आहे. चीननेही अजून त्या बाबतीत विशेष आस्था दाखवलेली नाही. चीन अशा बैठकीसाठी उत्सुक आहेसे स्पष्ट झाल्यावाचून अमेरिकन व्यापारी या खटाटोपात पडतील की नाही याबद्दल शंका आहे.

## ॲडनॉर राजवटीची फलश्रुति

ऑक्टोबरच्या मध्याला प. जर्मनीचे चॅन्सेलर डॉ. ॲडनॉर यांनी आपली अधिकारसूत्रे खाली ठेवली व डॉ. एरार्ड हे नवे चॅन्सेलर झाले. दुसऱ्या महायुद्धानंतरची ही दीर्घकालीन राजवट व तिची फलश्रुति या संबंधी लिहिताना ता. १८ ऑक्टोबरचा 'मँचेस्टर गार्डियन' म्हणतो :

"डॉ. ॲडनॉर यांच्या अधिकारत्यागाविषयी आजवर इतकी चर्चा झाली आहे की त्यामुळे ती घटना प्रत्यक्ष घडत असताना तिचे कोणासही फारसे महत्त्व वाटले नाही. पण त्यामुळे त्यांच्या कार्याचे ऐतिहासिक महत्त्व मात्र कमी लेखता कामा नये. पाश्चात्य राष्ट्रात पश्चिम जर्मनीला आज प्राप्त झालेले महत्त्वाचे स्थान हे केवळ त्यांच्यामुळेच प्राप्त झाले आहे असे म्हणता येईल. फ्रान्सशी नुकत्याच प्रस्थापित झालेल्या सलोख्याच्या संबंधाना देखील तेच जबाबदार आहेत. विशेषतः महत्त्वाची गोष्ट म्हणजे लोकशाहीची बीजे

योग्यरीतीने रुजण्यासाठी आवश्यक असलेले राजकीय स्थैर्य प. जमनीत स्थापन करण्याचे कायही त्यांचेच आहे.

काही वेळा अॅडनॉर यांचे स्वतःचे वर्तनही लोकशाही मार्गापासून दूर जाई हे खरे. ते एक स्वभावतःच अरेराव होते, त्यांची सत्तालालसाही अत्यंत तीव्र होती. यामुळे घटनात्मक संकेत त्यांच्या सरकारने पूर्णतया बाजूस ठेवल्याची " स्पिगेल " प्रकरणासारखी काही प्रकरणे दिसतात. परंतु सनदशीर राजवटीवरील त्यांची मौलिक श्रद्धा कधीच संशयास्पद नव्हती. जर्मन पार्श्वभूमीचा विचार करता प्रासंगिक प्रमादापेक्षा ही मौलिक श्रद्धा अधिक महत्त्वाची म्हटली पाहिजे. अगदी पहिल्या महायुद्धापासूनच्या काळाचा विचार केला तरी स्थिर स्वरूपाच्या सनदशीर राजवटीचे हे जर्मनीतील पहिलेच महत्त्वाचे उदाहरण म्हणता येईल.

तथापि ज्या गुणामुळे ते ही गोष्ट करू शकले तेच गुण डाव्या गटांमध्ये त्यांच्याविषयी सगळीकडे विरोधाची भावना निर्माण करण्यास जबाबदार ठरले! त्यांच्याविषयी महत्त्वाची गोष्ट म्हणजे ते उदारमतवादी किंवा सोशल डमोक्रॅट नव्हते, तर एक जुने परंपरावादी कान्झवटिव गृहस्थ होते ही होय. पण परंपरावादी असूनही सनदशीरपणाची बंधने त्यांनी स्वीकारली होती. वाय-मार प्रजासत्ताक उलथून पडण्याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे त्या राजवटीशी ' उजवे ' गट कधीच एकरूप झाले नव्हते ही होय. याबाबतीत डॉ. अॅडनॉर यशस्वी झाले असे म्हणता येईल. ते स्वतः उजव्या गटातील नसते तर कदाचित हे यश त्यांना मिळू शकले नसते असेही म्हणता येईल.

उलट अॅडनॉर राजवटीचे मोठे अपयश म्हणजे त्यांचे पूर्वेकडील धोरण हे होय. पाश्चात्य राष्ट्रात शक्य तितके पूर्णतया पूर्व जर्मनीला समाविष्ट करून घेण्याचा अॅडनॉरचा निश्चय होता. पाश्चात्य लोकशाहीबद्दल जिव्हाळा बाळगणाऱ्या सर्वांनी याबद्दल त्यांचे अभिनंदनच केले पाहिजे. तथापि मध्ययुरोपातील तणावा कमी झाल्यास हे कार्य अधिकच कठिण होईल, असा त्याने दुर्दैवाने समज करून घेतला होता; व जर्मन ऐक्याचा एकच मार्ग व तो म्हणजे पूर्व जर्मनीतिल राजवट कोसळून पडण्याची वाट पहात स्वस्थ बसणे हा होय अशा भ्रामक समजुतीत तो शेवटपर्यंत राहिला. बर्लिन भिंतीने या समजुतीचा फोलपणा स्पष्ट केला आहे.

अॅडनॉर राजवटीचा दुसरा महत्त्वाचा वारसा म्हणजे फ्रँको-जर्मन करारात व्यक्त झालेला फ्रान्सशी प्रस्थापित झालेला नवा संबंध होय. त्याने अधिकारत्याग केल्यानंतर यातील कितीसा भाग शिल्लक राहील हा एक प्रश्नच आहे ! तथापि हा संबंध केवळ व्यक्तिमत्त्वावर आधारलेला नसून त्याच्या मुळाशी सत्तेच्या राजकारणाची वस्तुस्थितीही आहे. अमेरिकेऐवजी फ्रान्सशी मैत्री जोडणे कोणतीही शहाणी जर्मन राजवट पसंत करणार नाही. तथापि द गॉलच्या मैत्रीचा पर्याय असल्याने अमेरिकेशी अधिक फायद्याचा करार करणे जर्मनीला शक्य आहे. डॉ. एरार्ड व डॉ. श्रोडर यांचे केनेडी राजवटीसंबंधी अधिक मैत्रीचे धोरण आहे खरे, पण त्यानादेखील अमेरिकेने अविवेकी भूमिका घेतल्यास द गॉल हजर आहे ही कल्पना समाधानकारकच वाटेल. "

### मॅक्मिलनचा काल :

अॅडनॉर बरोबरच दुसरा अधिकारत्याग म्हणजे ब्रिटनचे पंतप्रधान मॅक्मिलन यांचा. ह्या अधिकारत्यागाचे तात्कालिक कारण म्हणजे त्यांचा आजार व त्यातून उद्भवलेली शस्त्रक्रिया. एरवी कदाचित् आताच त्यानी अधिकारपद सोडले नसते. पण आजारानंतर सरकारी कामकाज व सार्वत्रिक निवडणुका ही दगदग आपणास सोसणार नाही हे त्यानी ओळखले व राजिनामा दिला. त्यांच्याविषयी लिहिताना ' मँचेस्टर गार्डियन ' म्हणतो :

" मॅक्मिलन हे एक तडफदार गृहस्थ आहेत. १९६३ हे वर्ष त्यांना व्यक्तिशः व त्यांच्या पक्षाच्या दृष्टीनेही अत्यंत वाईट गेले. अगदी अकल्पित दुर्दैवाचे कित्येक धक्के त्यांना सहन करावे लागले. या घटनांशी त्यानी निश्चितच झगडा दिला असता. आजारामुळे त्यांना तसे करता येऊ नये हा देखील दुर्दैवाचाच एक आघात होय. तथापि त्यांनी तसे दिसताच क्षणाचाही विलंब न करता अधिकारत्याग केला हे त्यांचे एक वैशिष्ट्यच म्हणावे लागेल.



अनुक्रमणिका








पंतप्रधानांना भूतकाळाची उत्कट जाणीव होती. आपले कार्य ते नेहमी इतिहासाच्या मोजमापाने जोखून पाहात, हे अर्थातच समाधानकारक म्हटले पाहिजे. ब्रिटनच्या इतिहासात 'मॅक्मिलन युग' म्हणून एक कालखंड निश्चित नोंदला जाईल. तथापि त्याचा विचार प्रचलित वाक्प्रचारांनी केला जाणार नाही अशी त्यांची खात्री आहे. राजकारणातील दैनंदिन घडामोडी कालांतराने विसरून जातात ही गोष्ट ते इतिहासापासून शिकले आहेत. मोठमोठ्या घडामोडी हाताळणे व एकूण परिणाम योग्य असले की लहान सहान चुकांकडे इतिहास दुर्लक्ष करतो हे त्यांना माहीत आहे. दोन महत्त्वाचे बदल त्यांनी पाहिले. ब्रिटिश जनतेची सुधारणारी आर्थिक स्थिती आणि कमी होत असलेल्या जागतिक महत्त्वाचा तिने सुबुद्धपणे केलेला स्वीकार. या दोन गोष्टींबद्दल आपली कारकीर्द ओळखली जावी अशी त्यांची इच्छा असू शकते. व ती सफलही होईल. या बदलांची आवश्यकता त्यांनी योग्य चातुर्याने ओळखली. तसे घडूनही येत आहेत. पण इतिहास असेही विचारील की हे बदल झपाट्याने घडवून आणण्याचा व त्याबरोबरच देशात कडवटपणा निर्माण न होऊ देण्याचा जाणीवयुक्त उत्साह त्यांनी दाखवला काय ?

सुएझच्या धक्क्यापासून देशाला व आपल्या पक्षालाही बाहेर काढण्याचे मॅक्मिलनचे कार्य दीर्घकालपर्यंत लक्षात राहील. ते खरोखरच आश्चर्यकारक कार्य होते. अगदी अल्पकाळात सुएझवरील हल्ल्याचे सारे परिणाम त्याने नाहीसे केले, आधी ज्या उद्दिष्टासाठी युद्धाची तयारी दाखवली होती ती सारी बाजूस टाकली, आणि हे सारे करीत असताना आक्रमण व त्याचे हेतू सर्वथैव योग्य होते ही भूमिका मात्र कायम ठेऊनच ! दुखावलेल्या अभिमानाला हा उपाय ठीक होता. पण त्यामुळे देशात बदललेल्या परिस्थितीची सुबुद्ध जाणीव निर्माण झाली काय ? त्याचप्रमाणे मॅक्मिलनने राष्ट्रकुलाशी पूर्ण इमान राखीत असल्याचा दावा सांगत असतानाच युरोपीय सामायिक बाजारपेठेत शिरण्याचा केलेला प्रयत्न हे त्याचे दुसरे मोठे कार्य. त्याने एक मोठी गरज पाहिली व ती पुरी करण्याचा प्रयत्न केला. तथापि युरोपीय दृष्टीकोण बदलण्याचा हाच योग्य मार्ग होता काय ? की त्या योगाने सर्व काही जादूच्या कांडीमुळे योग्य दिशेने घडून येईल ही भावना बळावून द गॉलचे आयतेच फावले ?

तथापि त्याच्या इतर कार्याबद्दल मात्र शंका घेण्यास फारसे कारण नाही. बदलत्या वातावरणाविषयीच्या त्याच्या भाषणाने भावी धोरणाची दिशा निश्चित केली. शिखर परिषद भरविण्याच्या त्याच्या भूमिकेवरून टीका झाली खरी, पण ती यशस्वी झाली नसली तरी तिच्या मुळाशी असलेले जागतिक राजकीय परिस्थितीचे आकलन योग्य होते हे आता स्पष्ट होऊ लागले आहे. उलट नव्याने निर्माण झालेली सुस्थिती ही पुरेशी आहे व तिचे स्वरूप सर्वस्वी योग्य आहे या त्याच्या विचाराबद्दल मात्र इतिहासाला फारशी सहानुभूति वाटणार नाही. या बाबतीत त्यांच्या वैयक्तिक मर्यादा आड आल्या असे म्हणावे लागते. त्यांची वैयक्तिक पार्श्वभूमी पहिल्या महायुद्धाच्या काळातील व तदनंतर त्यांचा हळूहळू निश्चित झालेला दृष्टिकोन, यामुळे राजकीय लोकशाहीबरोबरच सामाजिक लोकशाहीही असावी ही कल्पना त्याना तितकीशी रुचत नव्हती हे प्रसिद्ध आहे.

त्यांच्या राजवटीचे मूल्यमापन करताना ध्यानात घेण्याजोग्या याच महत्त्वाच्या गोष्टी आहेत. याबरोबरच मॅक्मिलनने कोणत्या प्रकारचे शासनयंत्र व सत्कार आपल्या वारसाला दिले हाही एक प्रश्न असू शकतो. तथापि याबद्दल आताच काही म्हणणे कठिण आहे. यंत्रणेत त्यानी मूलगामी बदल केल्याला अवघा पंधरा महिन्याचाच काळ लोटला आहे. मॅक्मिलनच्या त्यावेळच्या कडकपणामुळे भावी काळावर दृष्टी ठेवून पुढे जाण्याचे सामर्थ्य त्याच्या मंत्रिमंडळात बरेचसे उशीरा आले असे वाटते.

---














अनुक्रमणिका







सर्व तऱ्हेचें उत्तम,
सुबक कापड तसेंच
हातमाग व
पॉवरलूमसाठीं
लागणारें तलम
सूत माफक
भावांत मिळेल.






"इंदु हाउस", डुगल
बॅलार्ड इस्टेट, मुंबई
टेलेफोन नंबर २६












अनुक्रमणिका